# नवभारत

४८८२

**मराठी रंगभूमीचे गुणविशेष**

प्रि. श्री. ना. बनहट्टी.

**कलावंताचें स्वातंत्र्य**

श्री. दि. के. बेडेकर.

**बगीच्याकडे दृष्टिपात**

श्री. ना. ग. जोशी

**कै. तात्यासाहेब केळकर**

आचार्य शं. द. जावडेक

**युद्ध जिंकिलें पण स्वास्थ्य गमावलें**

प्रि. स. वा. कोगेकर.

**दिवाळीचा अितिहास**

प्रि. प. कृ. गोडे.

शिवाय प्रो. द. वा. पोतदार, श्री. ह. कृ. मोहनी, सेनापति बापट, रोहिणी भाटे, डॉ. वा. वि. आठल्ये. श्री. सतीश काळेलकर यांचे लेख.

**किंमत १ रुपया** **नोव्हेंबर १९४७**

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






वर्ष पहिलें
अंक दुसरा
नोव्हेंबर १९४७

# नवभारत

वार्षिक रु. ९
सहामाही रु. ५
अंकास रु. १

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक मंडळ :

आचार्य शं. द. जावडेकर | आचार्य स. ज. भागवत
श्री. हरि कृष्ण मोहनी | प्रो. वि. म. बेडेकर (कार्य. संपादक)

व्यवस्थापक : श्री. चिं. य. मराठे

---



अनुक्रमणिका








# भारताचें राष्ट्रीकरण

आचार्य शं. द. जावडेकर

सुमारें सव्वाशें वर्षांच्या परकीय ब्रिटिश अमलानंतर हिंदुस्थान देश आज स्वतंत्र झालेला आहे. या देशांत पाकिस्तान आणि हिंदीसंघराज्य अशीं दोन सार्वभौम स्वतंत्र राज्यें अस्तित्वांत आलीं असून त्यांत हिंदु, मुसलमान, शीख अशा धर्मांच्या राजांचीं लहान मोठीं पांचसहाशें संस्थानें पोटराज्यें म्हणून नांदत आहेत. हिंदी संघराज्य आणि पाकिस्तान हीं दोन राज्यें मुस्लीम लीगनें हिंदी राष्ट्रसभेशीं किंवा ब्रिटिश साम्राज्याशीं लढून निर्माण केलीं आहेत, अशी कोणाची समज असल्यास ती शुध्द भ्रामक भूल आहे. आज जीं हीं दोन राज्यें अस्तित्वांत आलीं आहेत, त्यांचें एक कारण राष्ट्रसभेनें ब्रिटिश साम्राज्याशीं गेलीं साठ वर्षें जो सनदशीर व सत्याग्रही लढा केला, त्या लढ्याचें जें तात्त्विक अधिष्ठान, त्या लोकशाहीच्या व स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार पाकिस्तानच्या प्रस्थापनेस हिंदी राष्ट्रसभा विरोध करूं शकली नाहीं, म्हणून ब्रिटिशांना या देशांतून जातां जातां असे दोन खंड करतां आले, असें सांगता येईल.

## राष्ट्रसभेच्या लढ्याचें मूळ अधिष्ठान

हिंदीराष्ट्रसभा स्वयंनिर्णय आणि लोकशाही या तत्त्वांनुसार सर्व हिंदुस्थानचें एक संयुक्त राज्य बनविण्यासाठीं ब्रिटिश सरकारशीं लढत होती. उलट ब्रिटिश सरकार राष्ट्रसभेला नामशेष करून हिंदुस्थानांत एकराष्ट्रीय भावना, लोकशाही आणि स्वयंनिर्णय हीं तत्वें हिंदी जनतेच्या अंतःकरणांत रुजूं नयेत, याबद्दल आपली सर्व शक्ति, सर्व सत्ता आणि सर्व द्रव्यबल खर्चीं घालून हिंदी जनतेंतील लोकशाही, राष्ट्रीयत्व छिन्नभिन्न करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होतें. या प्रयत्नांत ब्रिटिशांना साथ देण्याचें आणि राष्ट्रसभेला अडविण्याचें काम मुस्लिमलीग पक्ष आणि हिंदी संस्थानिक करीत होते. याशिवाय मुस्लिमेतर जनतेचें नेतृत्व करूं पहाणारे अनेक क्षुद्र पक्षही राष्ट्रसभेला विरोध करून आपापल्या पक्षसंघटना प्रबळ करण्याचा प्रयत्न करीत होते. पण हे क्षुद्र पक्ष राष्ट्रसभेनें मागें पाडले आणि मुसलमानांतही एक राष्ट्रीय पक्ष निर्माण केला. संस्थानिकांविरुध्द लढण्यासाठीं त्यांच्या प्रजाजनांना लोकशाहीचे लढे लढविण्यास प्रवृत्त केलें. असें असलें तरी मुसलमानांचे मतदारसंघ विभक्त केल्यामुळें त्या मतदारसंघांत राष्ट्रीय मुसलमानांना बहुमत मिळवितां आलें नाहीं. तसेंच संस्थानिकांच्या संरक्षणास ब्रिटिशांची सार्वभौम सत्ता आहे, तोंपर्यंत संस्थानी प्रजेच्या लोकशाही लढा पूर्णपणें यशस्वी करणें राष्ट्रसभेला शक्य झालें नाहीं. तरीही तिनें ब्रिटिशांना या देशांतून आपली सार्वभौम सत्ता काढून घेण्यास भाग पाडलें. परंतु ज्या प्रदेशांत मुसलमान जनता बहुसंख्य आहे, त्या प्रदेशावर पाकिस्तान स्थापन करण्यास मान्यता देणें तिला भाग पडलें. कारण जोंपर्यंत मुसलमान जनता बहुसंख्येनें राष्ट्रीय बनली नाहीं, तोंपर्यंत पाकिस्तानची मागणी स्वयंनिर्णयाच्या व लोकशाहीच्या तत्त्वानुसार त्या प्रदेशांतून धुडकावून लावणें राष्ट्रसभेला शक्य नव्हतें. हिंदुस्थानांत जें राष्ट्रीयत्व निर्माण करावयाचें, तें जातिधर्मातीत असलें पाहिजे. लोकशाहीवर उभारलेलें असलें पाहिजे








आणि जनतेच्या स्वयंनिर्णयाला बाधा न आणणारें असलें पाहिजे हीं तीन तत्वें राष्ट्रसभेनें प्रथमपासून आपल्या लक्ष्याचें अधिष्ठान म्हणून बनविलीं होतीं,

## मुस्लिम लीगची राष्ट्रसभेच्या तत्त्वांस मान्यता

अद्यापिहि या भरत खंडांत याच तीन तत्त्वांवर कोणतेंहि राष्ट्र व राज्य सुस्थिर होईल व चिरंतन टिकूं शकेल, अशी राष्ट्रसभेची निष्ठा आहे. ब्रिटिश लोकांनीं या तीनही तत्त्वांना अखेरीस संमति दिली आणि आपली सार्वभौम सत्ता पाकिस्तान आणि हिंदीसंघराज्य या दोन सार्वभौम राज्यांकडे पंधरा आगस्ट रोजीं सोंपवून दिली. हा इतिहास लक्षांत घेतल्यास मुस्लिमलीगला पाकिस्तान मिळविण्यांत यश आल्यासारखें जें दिसत आहे, तें यश आपल्या अज्ञानी जनतेनें जी द्विराष्ट्र भावना फैलावून देशांत दंगल माजवून दिली, त्या द्विराष्ट्रभावनेचें यश नसून राष्ट्रसभेनें पुरस्कारिलेल्या जातिधर्मातीत लोकशाहीच्या तत्त्वाचें व प्रादेशिक स्वयंनिर्णयाच्या तत्त्वांचें यश आहे, हें स्पष्ट होईल. पाकिस्तानला संमति देतांना धर्मविशिष्ट राष्ट्रभावनेचें तत्त्व हिंदी राष्ट्रसभेला मान्य करावें लागलें नाहीं, इतकेंच नाहीं तर पाकिस्तानच्या संस्थापनेस ब्रिटिशांकडून व राष्ट्रसभेकडून संमति मिळवितांना मुस्लिम लीगला मात्र आपलें धर्मविशिष्ट राष्ट्रीयत्वाचें तत्त्व सोडून द्यावें लागलें. जातिधर्मातीत राष्ट्रीयत्व, लोकशाही आणि प्रादेशिक स्वयंनिर्णय हीं राष्ट्रसभेचींच तीन तत्त्वें मान्य करणें तिला भाग पडलें. मुस्लिम लीग पक्ष, त्या पक्षाचे नेते व पाकिस्तानची घटनासमिति या सर्वांनीं आज या तीन तत्वांना अधिकृतपणें मान्यता दिलेली आहे. अशाप्रकारें आज हिंदुस्थानांत दोन राज्यें अस्तित्वांत आलीं असलीं, तरी तीं अस्तित्वांत येतांना राष्ट्रसभेची तत्त्वभ्रष्टता झालेली नसून मुस्लिम लीगलाच तिच्या धर्मविशिष्ट राष्ट्रभावनेपासून भ्रष्ट व्हावें लागलें आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. अर्थात् या तत्त्वानुसार मुस्लिम लीग व पाकिस्तानांतील राज्य वागलें नाहीं तर त्यावर काय उपाय करावयाचा, म्हणजे त्यांनीं हिंदीसंघराज्यावर चढाई केली, तर त्यांचें पारिपत्य कसें करावयाचें आणि आपल्या संघराज्यांत असणाऱ्या मुसलमानांना संघराज्याशीं एकनिष्ठ कसें बनवावयाचें, याचाही विचार या संघराज्यावर राज्य करीत असलेल्या राष्ट्रसभेला करणें भाग आहे व तो तिनें केलाहि आहे. यासाठींच राष्ट्रसभेनें व संघराज्यांतील घटनापरिषदेनें आपल्या राज्याची घटना जातिधर्मभेदातीत राष्ट्रीयत्व आणि लोकशाही या तत्त्वांवर केलेली असून या तत्त्वांचें निदर्शक असें आपलें राष्ट्रीय निशाण बनविलें आहे. या संघराज्यांत नांदणाऱ्या प्रत्येक राष्ट्रिकाला या तत्त्वांशीं व झेंड्याशीं एकनिष्ठ रहावेंच लागेल आणि जे त्यांचा द्रोह करतील, ते कोणत्याही धर्माचे व जातीचे असले तरी त्यांच्या डोक्यांवर या संघराज्याचा राजदंड आघात केल्यावांचून रहाणार नाहीं. जनतेला हीं तत्त्वें उपदेशानें बुद्धिबलानें आणि आत्मबलानें, म्हणजे त्यागाच्या व सेवेच्या तपश्चर्येनें, पटवून देणारे महात्मा गांधींच्यासारखे सत्याग्रही ह्या झेंड्याच्यामागें उभे आहेत. त्याचप्रमाणें त्या झेंड्यांचा द्रोह करून लोकशाहीराज्याविरुद्ध धर्माच्या किंवा जातींच्या नांवानें बंडाळी करणाऱ्यांचें पारिपत्य करणारी राष्ट्रसभेचीं प्रांतिक व मध्यवर्ती सरकारें या झेंड्याच्या संरक्षणास सज्ज आहेत. या दोन शक्ती जोंपर्यंत क्षीण झालेल्या नाहींत, तोंपर्यंत हिंदी संघराज्याला पाकिस्तानापासून किंवा धर्मवेडानें जनतेला बेहोष करून दंगल उडविणाऱ्या पक्षांपासून कोणतेंही भय धरण्याचें कारण नाहीं. आणि म्हणूनच हिंदी संघराज्यांतील प्रत्येक राष्ट्रिकाचें आद्य कर्तव्य आपलें सर्वस्व वेंचून या दोन शक्ती यत्किंचितही क्षीण न होतां त्यांची एकसारखी अधिकाधिक वाढच होत राहील, असे सर्व प्रयत्न करणें हेंच आहे.

## मराठ्यांचें धर्मनिरपेक्ष राजकारण

हिंदुस्थानच्या राष्ट्रीकरणाच्या आड येणारी सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे हिंदूंची जातिभेदवृत्ति ही होय. हजारों वर्षें हिंदुस्थानांत जातिसंस्था वाढत आलेली असून तिच्यामुळें सामाजिक विषमता कळसास पोहोंचलेली आहे. मुसलमान राजांचा प्रवेश हिंदुस्थानांत होण्यापूर्वी हा जातिभेदांतून उत्पन्न झालेला उचनीच भाव फारच वाढलेला होता. गझनीचा महंमद हिंदुस्थानांत येण्यापूर्वी चार–पांचशें वर्षें हिंदुस्थानांत ही जातिसंस्था अत्यंत








दृढमूल होऊन हिंदु संस्कृतीचा विकास थांबूं लागला होता. इ. स. च्या तेराव्या शतकांत दिल्लीस मुसलमानांनीं आपलें सार्वभौमत्व स्थापन करण्याचा उपक्रम सुरूं केला. या वेळेपासून दिल्लीवर मुसलमानी बादशहांनीं राज्य करावें, अशी परंपरा एकोणिसाव्या शतकांत ब्रिटिशांचें साम्राज्य हिंदुस्थानांत सार्वभौम बनेपर्यंत अखंड चालूं होती. अर्थात् केवळ दिल्लीचा बादशहा बनल्यानें सर्व हिंदुस्थानचें सार्वभौमत्व कोणासही मिळत होतें, असें नाहीं. तरीही दिल्ली ही सर्व हिंदुस्थानची राजधानी आहे, ही भावना अनेक शतकें हिंदी जनतेच्या अंतःकरणांत रुजलेली होती आणि त्या दिल्लीच्या तक्तावर ब्रिटिशांपूर्वी सतत पांचसहा शतकें मुसलमान धर्माचे सुलतान किंवा बादशहा राज्य करीत होते. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर जेव्हां मराठ्यांनीं दिल्ली हस्तगत करून सर्व हिंदुस्थानचें सार्वभौमत्व आपल्या हातीं घेण्याचा प्रयत्न केला, तेव्हांही त्यांनीं तो प्रयत्न आपण हिंदुपदपातशाहीची संस्थापना करणार आहों, अशा नांवानें न करतां आम्हीं मोंगल बादशाहीचे प्रतिनिधि व संरक्षक आहोंत, अशी घोषणा करूनच केला होता. म्हणजे दिल्लीचें तक्त मुसलमानांच्या हातीं असावें ही परंपरा त्यांनाही प्रत्यक्ष राजकीय व्यवहार करीत असतां पुढें चालवावी लागली. पानिपतास जें भीषण रणकंदन झालें, तें सुद्धां सदाशिवराव भाऊ यांनीं आम्ही दिल्लीस हिंदुपदपातशाही स्थापन करणार या वृत्तीनें केलें नव्हतें, तर आम्हीं मोंगल बादशहाचे प्रतिनिधि म्हणून व त्याचे संरक्षक म्हणून सर्व हिंदुस्थानभर व काबूलकंदाहारपर्यंत सार्वभौमत्व गाजविणार, अशा घोषणेनेंच केलें होतें. यावेळीं त्यांची मुख्य मदार इब्राहिमखान गारदी याच्या तोफखान्यावर होती, हें सर्वश्रुत आहे. हिंदुस्थानांत अहमदशहा अब्दालीसारख्या परकीय राजाला बोलावून येथील बादशहाची वजीरी आपल्या हातीं घ्यावी असा प्रयत्न नजीबखान रोहिला करीत होता. याच्या विरुद्ध अयोध्येचा नवाब आपल्या पक्षांत सामील करून घ्यावा असा प्रयत्न सदाशिवरावभाऊ यांनीं अखेरपर्यंत चालविला होता. हा सर्व इतिहास लक्षांत घेतां मराठ्यांचे प्रयत्न दिल्लीच्या राज्यकारभारांत परकीयांची ढवळाढवळ होऊं नये आणि त्यासाठीं हिंदु-मुसलमान धर्मांच्या सर्व एतद्देशीय राष्ट्रनिष्ठांना एकत्र आणावें, अशा प्रकारचाच होता, असेंही आपणांस म्हणतां येईल. उत्तरहिंदुस्थानांतील रजपूत, जाट वगैरे हिंदु राजे या वेळीं मनानें मराठ्यांच्या विरुद्ध व अब्दालीच्या बाजूचे होते. अब्दालीला बोलावून आणणाऱ्या नजीबखान रोहिल्यांशीं मल्हारराव होळकर हा मातब्बर मराठा सरदार बरेच दिवस स्नेहसंबंध ठेवून होता आणि त्याचें निर्मूलन करणें, हें मल्हाररावांस इष्ट वाटत नव्हतें. पानिपतापूर्वीच्या व नंतरच्या सर्व घटना लक्षांत घेतल्या असतांना, मराठे लोकांचे दिल्ली काबीज करण्याचे प्रयत्न व सर्व हिंदुस्थानचें सार्वभौमत्व आपल्या हातीं आणण्याचे प्रयत्न हिंदुपदपातशाही स्थापन करण्याच्या दिशेनें होत नव्हते, हें उघड होतें. यापुढें पानिपतच्या वेळीं मराठ्यांचा जो पराभव झाला त्याची भरपाई करणाऱ्या महादजी शिंद्यांच्या प्रयत्नांकडे पाहिलें, तरी त्यांचेही यत्न ( अंतःकरणांत कोणतीही भावना असली तरी ) दिल्लीच्या मोंगल बादशाहीचें सार्वभौमत्व सर्व हिंदुस्थानभर प्रस्थापित करण्याच्या दिशेनेंच चालू होते, असें म्हणावें लागतें. मात्र मराठ्यांनीं ही सत्ता आपल्या हातीं घेण्याचा उपक्रम करीत असतां हिंदुपदपातशाहीच्या स्थापनेचें ध्येय उद्घोषित केलें नसलें, तरी औरंगजेबानें मोंगल बादशाहीला जें संकुचित धर्मनिष्ठेचें म्हणजेच परधर्मद्वेषाचें स्वरूप दिलें होतें, तें नष्ट करून सर्वधर्मांचें सहिष्णुतेनें व समतेनें रक्षण करणें, हेंच आपलें कर्तव्य आहे, असें मात्र मराठ्यांनीं मोंगलबादशहाकडून वदवून घेतलें होतें व त्याच धोरणानें आम्हीं दिल्लीचा कारभार करूं व मोंगल बादशाहीचें संरक्षण करूं असा करार मराठ्यांच्या वतीनें शिंदे-होळकरांनीं मोंगलबादशहाशीं केला होता. मल्हारराव होळकर व जयाजी शिंदे यांनीं दिल्लीच्या बादशाहीशीं जो करार केला, त्यांत पुढील मजकूर होता. "आम्हीं मुसलमानांच्या व हिंदूंच्या धर्मांचें संरक्षण करूं. कोणाला अडथळा करूं देणार नाहीं." " आम्हीं दोघे व इतर अमीर उमराव नित्याप्रमाणें हुजूरच्या सेवेस हजर राहूं आणि अब्दाली वगैरेंचें पारिपत्य करण्याच्या कामीं आमचाच सल्ला










हुजूर ऐकतील, तर तें काम आम्हीं स्वतःच बजावूं. जे जहागीरदार सरकारच्याकरी करीत नसतील, त्यांच्या जहागिरी सरकारांत दाखल करूं व त्यांतून आपली चौथ काढून घेऊं. आणि केलेल्या कौलकरारांशीं कधींही फिरणार नाहीं." अशा रीतीनें मराठ्यांनीं दिल्लीची सत्ता आपल्या हातीं घेतांना मोंगलबादशहाकडून सर्वधर्मसमतेचें तत्त्व मान्य करवून घेतलें.

## मोंगल बादशाहीच्या नाशाचें कारण

जें तत्त्व अकबरानें सोळाव्या शतकाच्या अखेरीस स्वीकारलें आणि ज्या तत्त्वाच्या अधिष्ठानावर मोंगलांचें साम्राज्य चिरंतन करण्याचा त्यानें प्रयत्न केला, तें तत्त्व औरंजेबानें सोडून दिलें होतें आणि परधर्मीयांचा द्वेष व छळ करण्याचें तत्त्व स्वीकारून मोंगल बादशाहीचा नाश केला होता. औरंगजेबाच्या या दुष्ट तत्वाचे राजकीय परिणाम त्याच्या मृत्यूनंतर पांचदहा वर्षांच्या आंतच दिल्लीच्या मोंगल बादशहाला भोगावे लागले. खुद्द औरंगजेबाच्या एका मुलानेंहि परिणामांची जाणीव करून देण्याचा प्रयत्न केला होता. हा मुलगा औरंजेबाची कानउघाडणी करतांना त्यास लिहितो, "ज्या रजपुतांनीं अकबर, जहांगीर व शहाजहान यांस मनापासून साहाय्य केलें, त्यांचा आश्रय मी केला ह्यांत वाईट तें काय केलें? जसवंतसिंग तुमच्या भुलथापांस भुलला नसता, तर तुम्ही आज हिंदुस्थानचे बादशहा झाले नसता. असे हे रजपूत लोक आपल्या राज्याचे खांब होते. पूर्वी फौजेंत रजपूत पाहिजे असले म्हणजे एकाचे ठिकाणीं शंभर उमेदवार येत. हल्लीं तुम्हीं तीन तीन वर्षें डांगोरा पिटून सुद्धां पांच माणसेंहि जमा होत नाहींत. फौजेंतील सर्व लोक दरिद्री झाले आहेत. व्यापाऱ्यांची व धनिकांची लूट होते व खून होतात. रयत धुळीस मिळाली. दक्षिणचा प्रदेश जो पूर्वी केवळ स्वर्गतुल्य वाटत होता, तो हल्लीं ओसाड, निर्जन व निर्धन झाला आहे. विजापूर, औरंगाबाद, हीं केवढीं मोठीं व सुंदर शहरें, पण हल्लीं मातीशिवाय तेथें जास्त काय आहे? या सर्वांचें कारण काय तर तुमचा परधर्मद्वेष. तुम्हीं हिंदूंवर जिझिया बसविला. त्यानें सर्व लोक तुमच्यावर उठले. जाळपोळ व लूट करूं लागले. तुमच्या राज्यांत एकही प्रकार असा आहे कां कीं, ज्याची मला तारीफ करतां येईल? थोर थोर पुरातन घराणीं सर्व धुळीस मिळालीं. सर्वत्र लुच्चेगिरीचा बाजार भरला आहे. राज्यकारभार सर्व हरामखोर लोकांच्या हातांत आहे. हातांत जपमाळ, काखेंत कुराण, डोक्यास मोठेंसें पागोटें असलें, म्हणजे तुमचा त्यावर पूर्ण भरंवसा. अशी मंडळी तुमच्या राज्याचे आधारस्तंभ. अशा सर्व राज्याचा नाश झालेला मला पहावेना. तेव्हां अत्यंत कष्टानें मी देशत्याग करून इकडे आलों. आतां मी शांत आहे." (महाराष्ट्र. इतिहास-मंजरी—द. वि. आपटे)

## हिंदी संस्कृतीची अनाग्रही वृत्ति

हिंदुस्थानांत अनेक धर्मांचे व जातींचे लोक प्रथमपासून रहात असल्यानें, येथील राज्यकर्त्यांनीं कोणत्याही एकाच धर्माशीं तादात्म्य पावून इतरांविरुद्ध पक्षपात करणें, हें जसें अन्यायाचें तसेंच राज्यविघातकही आहे, अशी समजूत फार पुरातन कालापासून येथें रूढ झालेली आहे. अशोक, समुद्रगुप्त, हर्ष, अकबर, शिवाजी इत्यादि सर्व थोर राज्यकर्त्यांनीं अथवा सम्राटांनीं हें तत्त्व आपल्या राजनीतीचें अधिष्ठान बनविलें होतें. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील अनेक थोर धर्मपुरुषांनींही परधर्मसहिष्णुतेचें, म्हणजेच 'सर्व धर्मी समानत्वा'चें तत्त्व उपदेशिलेलें आहे. हिंदुस्थानांत निर्माण झालेल्या अनेक धर्मपंथांनीं आणि तत्त्वज्ञानांनीं, तसेंच लोकप्रियता संपादन केलेल्या सर्व राज्यकर्त्यांनीं, या थोर तत्त्वांचा अवलंब केल्यामुळें हिंदी जनतेच्या अंतःकरणांतही तें खोल रुजलेलें आहे. यामुळें आधुनिक काळामध्यें धर्मजातिभेदातीत राष्ट्रीयत्वाची भावना जागृत करण्यास येथील आधुनिक राष्ट्रनिर्मात्यांस फार कष्ट करावे लागले नाहींत. हिंदी संस्कृतीचा हा एक प्राचीन ठेवा असून हिंदु संस्कृतींत अध्यात्मशास्त्राला एका अनुभवसिद्ध शास्त्राचें स्वरूप देण्याचा प्रयत्न झालेला असल्यानें, इतर शास्त्रांप्रमाणें सर्व धर्मांच्या बुडाशीं असणाऱ्या अध्यात्मशास्त्रांतील सिद्धांताकडे अनाग्रहबुद्धीनें व सत्यसंशोधनाच्या शुद्ध निःपक्षपात दृष्टीनें हिंदु लोक पाहूं शकतात. कोणत्याही शास्त्रांतील कोणतेही सिद्धांत पूर्णत्वास








गेलेले नाहींत आणि म्हणून त्यांत स्वतंत्र बुद्धीनें व स्वानुभूतीनें भर घालण्याचा अधिकार प्रत्येकास प्राप्त करून घेतां येतो. हें आधुनिक तत्त्व हिंदुसंस्कृतींत वाढलेल्या मनुष्यास पटण्यास अथवा पटविण्यास फारसे सायास पडत नाहींत. तथापि मुसलमान व ख्रिस्ती धर्मांत आध्यात्मिक सिद्धांतांसंबंधीं इतकी अनाग्रही वृत्ति पूर्वीपासून असलेली दिसून येत नाहीं. मुसलमान धर्मानें आपल्या समाजाच्या घटनेंतून वंशभेद आणि जातिभेद यांचें उचाटन केलेलें आहे. तसेंच मूर्तिपूजा आणि अनेकदेवतावाद यांचा उच्छेद करून शुद्ध एकेश्वरी मत मोठ्या हिरिरीनें जगभर पसरविण्याचा प्रयत्न त्याच्या अभिमान्यांनीं केला. पण असें करतांना इतरांच्या धर्ममतांविषयीं व धर्माचाराविषयीं सहिष्णुता ठेवण्याचें महंमद पैगंबरानें उपदेशिलेलें तत्त्व त्यांनीं अंमलांत आणण्याचें सोडून दिलें. स्वतःच्या धर्मासंबंधीं असलेला त्यांचा अभिमान अहंकारी बनला. आणि इतरांच्या धर्मासंबंधीं ते असहिष्णु वृत्ति धारण करूं लागले. अकबर बादशहानें आपल्या पूर्वी नुकत्याच होऊन गेलेल्या कबीर, नानक इत्यादि हिंदुमुसलमान संतांच्या उपदेशास अनुसरून आपल्या राज्यकारभाराचें धोरण धर्मभेदातीत असावें, असें ठरवून दिलें. या त्याच्या उदार धोरणाचें गुणगान शिवाजीसारख्या हिंदवी स्वराज्याची संस्थापना करणाऱ्यानेंही मुक्त कंठानें केलेलें आहे. औरंगजेबास जिझिया कराच्या निषेधासाठीं लिहिलेल्या पत्रांत शिवाजी महाराजांनीं अकबराच्या या उदार धोरणाचें पुढीलप्रमाणें गुणगान केलें आहे. "पूर्वी अकबर पादशहा यांनीं बावन वर्षें पादशाही केली. यामुळें एकंदर हिंदू वगैरे लोकांचे धर्म चांगले चालले व ते धर्मस्थापनेविषयीं मदत ठेवित होते. सबब जगद्गुरु अशी त्यांची कीर्ति झाली व त्यास हरएक स्थळीं यश येत होतें." अशा तऱ्हेचे उद्गार काढून **शिवाजी महाराजांनीं राज्यसंस्था धर्मभेदातीत असावी, या तत्त्वाचाच पुरस्कार केलेला आहे.** त्या धोरणाचे राजकीय सुपरिणामही त्यांत वर्णिले आहेत.

### 'हिंदुराष्ट्र' ही विचारसरणि हा शुद्ध अविवेक.

पाकिस्तानवादी मुस्लिम लीगनें द्विराष्ट्रवादाचा घातक प्रचार करून इंग्लिशांच्या मदतीनें देशांत दंगल उडविल्यामुळें कांहीं हिंदुधर्मीय लोक आज पाकिस्तानाव्यतिरिक्त उरलेल्या हिंदी संघराज्यास आतां "हिंदुराष्ट्र" असें नांव द्यावें, असें प्रतिक्रियावृत्तीनें पुन्हां प्रतिपादूं लागले आहेत. ज्यावेळीं पाकिस्तानवाल्या मुस्लिम लीग पक्षासही आपलें धर्मवार राष्ट्राचें तत्त्व सोडून देणें भाग पडत आहे आणि हिंदी संघराज्यांतील मुस्लिम लीग पक्षाचे लोकही या राष्ट्राच्या तिरंगी झेंड्यास वंदन करून धर्मातीत राष्ट्रनिष्ठा मान्य करूं लागले आहेत किंवा तसें करणें त्यांस भाग पडत आहे, त्याच वेळीं आजपर्यंत आपल्या थोर संस्कृतीचें द्योतक आणि आधुनिक युगास शोभणारें असें पुरोगामी तत्त्व म्हणून आपण ज्या तत्त्वाचा अभिमान धरला, तें तत्त्व केवळ क्षणिकविकारवश बुद्धीनें आम्हीं सोडून देणें हा शुद्ध अविवेक होईल. हिंदुसमाजघटनेंत बद्धमूल झालेलें जातिसंस्थेचें विघातक तत्त्व सामाजिक विषमता निर्माण करतें, म्हणून आज आपण तें समूळ उच्छेदून टाकीत आहोंत. अशा वेळीं आपली राष्ट्रीय भावना हिंदुत्वनिष्ठेच्या बंधनांनीं संकुचित करणें म्हणजे पुन्हां आपलें राष्ट्रीयत्व धर्मभेदांनीं दुभंगण्यासारखें अथवा छिन्नभिन्न करण्यासारखेंच अविवेकी कृत्य होणार आहे. जे हिंदु नाहींत असे मुसलमानांव्यतिरिक्तहि कोट्यवधि लोक आज हिंदी-संघराज्यांत नांदत आहेत. तसेंच हिंदुधर्मांत असणारे लोकही अनेक जातींनीं व जमातींनीं विभागलेले आहेत. मुसलमानांचा धार्मिक अहंकार हा जसा राष्ट्रें दुभंगण्यास कारण होतो, त्याचप्रमाणें हिंदूंचा जातीय अहंकार हाहि एकराष्ट्रीयत्वास विघातक होतो, याचा अनुभव आपणांस पुरेपूर आलेला आहे. असें असतां एका बाजूनें राष्ट्रीयत्व दुभंगविणारा जातिभेद नष्ट करीत असतां दुसऱ्या बाजूनें धर्मनिष्ठेच्या नांवानें हिंदुराष्ट्रवादाचें ध्येय स्वीकारून आपलें राष्ट्रीयत्व दुभंगविणारें दुसरें तत्त्व पुरस्कारणें हा अविवेकच नव्हे तर काय ? आज आपण ज्याप्रकारचें राष्ट्र निर्माण करूं इच्छितों, तशाप्रकारच्या राष्ट्राचें रक्षण करण्यास आणि त्याच्या अंतर्बाह्य शत्रूंचें पारिपत्य करण्यास अवश्य असणारें राज्ययंत्र आपल्या हातीं आलें आहे. या राज्ययंत्राची उभारणी जातिधर्मभेदातीत लोकशाहीवर



अनुक्रमणिका

आपण केलेली आहे. अशावेळीं पूर्वीचे धर्मनिष्ठ व जातिनिष्ठ राजकीय पक्ष नष्ट करण्यास ब्रिटिशांच्या सत्तेचा अंत झाल्यामुळें अपूर्व अशी संधि आपणांस प्राप्त झाली आहे. अशावेळीं आमचें राष्ट्र हें हिंदूराष्ट्र बनलें पाहिजे, असा आग्रह धरणें म्हणजे आम्ही आधुनिक युगांतून मध्ययुगांत उडी मारणें आणि आपलें राष्ट्र जगांतील इतर राष्ट्रांच्या मागें ठेवण्यास अथवा लोटण्यास आपण होऊन साहाय्य करण्यासारखेंच आहे. सव्वाशें वर्षांपूर्वी आम्हीं तत्कालीन जगाच्या मागें राहिलों, म्हणून ब्रिटिशांचे दास बनलों. आतां पुन्हां स्वतंत्र राष्ट्र बनून जगाच्या आघाडीस जाण्याची अपूर्व संधि प्राप्त झाली आहे. यावेळीं कोणतेंही कारण नसतांना व ब्रिटिश राज्यकर्त्यांची अडचण दूर झाली असतांना आपण या संधीचा योग्य फायदा घेतला नाहीं व आपलें राष्ट्रत्व संकुचित बनविलें व तें राष्ट्र दुभंगलें तर आमच्या इतके मूर्ख व नादान कोणीहि नाहींत असेंच ठरेल !

## आधुनिक युरोपच्या नाशाचें कारण

धर्मभेदांनीं आणि जातिभेदांनीं राष्ट्रें दुभंगतात, याचा अनुभव आम्हांस भरपूर आला असून आमचा सर्व इतिहास त्याचीच साक्ष देत आहे. हें जातिभेदातीत व धर्मभेदातीत राष्ट्रीयत्वाचें तत्त्व आधुनिक युरोपनें अवलंबिलें व त्यामुळेंच युरोपखंड भरतखंडाच्या पुढें गेलें. पण आमच्यापुढें गेलेलें युरोपखंड आज जमीनदोस्त होऊन पडलें असून त्याच्यावर रशिया किंवा अमेरिका यांच्या आहारीं जाण्याचा दुर्धर प्रसंग आज ओढवलेला आहे. हा प्रसंग त्यावर कां ओढवला ? याचा आपण विचार केला पाहिजे. तीनशें वर्षांपूर्वी आधुनिक युरोपांत जी संस्कृति निर्माण झाली, ती भांडवलशाहीच्या आहारीं गेली आणि या भांडवलशाहींतून निर्माण होणारा आर्थिक वर्गभेद हा आधुनिक युरोपच्या नाशास कारण झाला आहे. गेल्या तीसपसतीस वर्षांत युरोपांतील भांडवलशाहीनें दोन जागतिक महायुद्धें निर्माण केलीं आणि आशिया आणि युरोप या दोनही खंडांची राखरांगोळी केली ! हें दृश्य पाहिल्यास ब्रिटिशांनीं आपलें साम्राज्य टिकविण्यासाठीं आमच्या राष्ट्रांतून जातां जातां धर्मकलहाचा जो वणवा पेटविला तो एकदोन महिन्यांत आम्हांस पूर्णपणें शांत करतां आला नाहीं, येवढ्यानें आम्हीं आधुनिक युरोपांतील लोकांपेक्षां आज कमी सुधारलेले आहोंत, असें कोणीही म्हणूं शकणार नाहीं. हिंदू, मुसलमान व शीख धर्मवेडानें बेभान होऊन एकमेकांचें रक्त आज सांडीत असले, तरी आमचें लोकशाही राष्ट्रीय सरकार लौकरच त्यांना शांत करील आणि महात्मा गांधींच्यासारखे असामान्य शांतिदूत त्यांना आपल्या मानवधर्माची पुन्हां जागृति अथवा स्मृति करून देतील यांत तिळप्राय शंका नाहीं. परंतु युरोपखंड सर्व जगभर युद्धें पेटविणारी आणि प्रत्येक राष्ट्रास आर्थिक वर्गभेदानें दुभंगविणारी भांडवलशाही संस्कृति सोडून देईल किंवा नाहीं, याबद्दल कोणासही खात्री देतां येत नाहीं. ज्या भांडवलशाही संस्कृतीमुळें आधुनिक युरोपची भरभराट झाली, तिच्यावर त्याची इतकी भक्ति बसलेली आहे कीं, तिच्या अंताबरोबर आधुनिक युरोप आपलाही अंत ओढवून घेणार नाहीं, असें आज कोणासही सिद्ध करतां येत नाहीं.

## राष्ट्रीय स्वातंत्र्य समाजवादाशीं निगडित

पण आपल्यापुढें युरोपखंडाचें भवितव्य कोणतें होणार, हा प्रश्न नसून भरतखंडाचें भवितव्य आपण कोणतें बनविणार हाच आपल्यापुढें महत्त्वाचा व निकडीचा प्रश्न आहे. त्याचें उत्तर देतांना आमचें राष्ट्र धर्मभेद व जातिभेद यांचें निर्मूलन करून आम्हीं एकजीव बनवूं, असें जसें आपण म्हणतों, तसेंच लोकशाही आणि राष्ट्रीयत्व या दोहोंना दुभंगविणारी भांडवलशाही संस्कृति नामशेष करून आम्हीं आमच्या राष्ट्राची समाजघटना एकवर्ग बनवूं, असें निःसंदिग्ध वृत्तीनें आपण उत्तर दिलें पाहिजे. भांडवलदार आणि कामगार हा वर्गभेद नष्ट करून आम्हीं समाजवादी लोकशाही स्थापन करणार, मात्र तसें करीत असतां आम्हीं आमच्या राष्ट्रांत नव्यानेंच उदय पावलेल्या लोकशाहीचा घात करणार नाहीं व करूं देणार नाहीं, ही निष्ठा जर आपण हिंदीसंघराज्यांतील सामान्य जनतेंत त्वरित निर्माण करूं शकलों नाहीं तर मात्र आमच्या राष्ट्रास खात्रीनें धोका आहे. आमचें राष्ट्रीय स्वातंत्र्य हें

• [ पान ७७ पहा.








# आत्मनिरीक्षण व मानसशास्त्राचा अभ्यास

डॉ. वा. वि. आठल्ये

"In all this ferment of experiment, of invention, of selection, we need, above all things, understanding of human nature, an understanding of others and of ourselves, especially ourselves."

William McDougall.

वैयक्तिक अथवा सामुदायिक उन्नतिकरितां भिन्न प्रयोग, संशोधनें, विवरणें व नियोजनें होत आहेत. तीं होत असतांना आपणांस मानवी स्वभावाचें सम्यक् ज्ञान होणें ही प्राथमिक महत्त्वाची बाब होय. आणि अर्थातच स्वतःविषयींचें योग्य ज्ञान असणें क्रमप्राप्तच ठरतें. ह्या आत्मज्ञानाच्या प्रयत्नांत इतरांनीं आपल्याविषयीं केलेलें निरीक्षण कांहीं अंशीं उपयोगी पडूं शकतें. परंतु आपलें आपण केलेलें निरीक्षण अधिक उपयुक्त होय.

परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, मनुष्य आपल्या आयुष्यभर आत्मसंतोषानें व आत्मकौतुकानें इतका अवलिप्त असतो कीं त्याला आत्मनिरीक्षणाची गरजच भासत नाहीं. आणि जेव्हां ती त्याला पुढील आयुष्यांत भासूं लागते तेव्हां आत्मनिरीक्षणाच्या साहाय्यानें आत्मज्ञान करून घेण्याची व आत्मज्ञानावर अवलंबून असणारी श्रेष्ठ उन्नति हस्तगत करण्याची त्याची पात्रता नाहींशी झालेली असते.

## बहिर्मुखतेचा अतिरेक

आत्मनिरीक्षणाकरितां अंतर्मुख व्हावें लागतें. पण त्याचा तर सामान्यतः सर्वांना कंटाळा असतो. तथापि अंतर्मुख झाल्याशिवाय स्वतःच्या इच्छा, वृत्ती, आवडी व निवडी यांच्या बरेंवाईटपणाचें खरें ज्ञान होत नाहीं. अंतर्मुख होणें म्हणजे एक अनावश्यक बाब अथवा भानगड आपल्यामागें लावून घेणें होय असें कांहीं लोक समजतात. घरीं व शाळेंत मुलांचें मन बाह्य जीवनांत इतकें गुरफटविलेलें असतें आणि पोक्त माणसेंहि त्या जीवनांत इतकीं दंग असतात कीं त्यांना अंतर्मुखतेची इष्टता ध्यानांत येण्यास संधिच नसते. समाजाचें अथवा राष्ट्राचें हित करण्याकरितां उद्युक्त झालेल्या सार्वजनिक कार्यकर्त्यांमध्येंहि ही उणीव दिसून येते. सार्वजनिक जीवनांत देखील अंतर्मुखता व बहिर्मुखता असे दोन भाग असतात. आणि सामान्यतः कार्यकर्ते दुसऱ्या भागानेंच मोहित होतात. पाश्चात्य जगाशीं संबंध आल्यापासून पौर्वात्य मनांत एक इष्ट फरक घडून आलेला आहे, आणि तो म्हणजे आपल्या ऐहिक जीवनाकडे आपण काळजीपूर्वक लक्ष देऊन त्याची चांगली घडी बसविली पाहिजे, ह्या विचारसरणीला मिळत असलेली मान्यता होय. परंतु हा फरक होत असतांना पौर्वात्य मनाचा तोल नाहींसा होऊन तें (कांहीं विचारवंतांचा अपवाद सोडतां) सर्वस्वीं बहिर्मुख झालेलें दिसत आहे. उपरिनिर्दिष्ट परिवर्तनांतील ही अनिष्ट बाजू होय.

बहिर्मुखतेच्या अतिरेकांतून अनेक अहितकारक वृत्ती निर्माण होतात. आपण एकच उदाहरण घेऊं : आपण दुसऱ्यांच्या दुर्गुणांविषयीं व दोषांविषयीं चर्चा करतों, पण स्वतःचे दुर्गुण व दोष पाहत नाहीं. ह्या वृत्तीचा फैलाव लहानांपासून मोठ्यांपर्यंत आणि








खाजगी जीवनाप्रमाणें सार्वजनिक जीवनांत सर्वत्र झालेला आढळतो.

## वाङ्मयावर बहिर्मुखतेची छाप

विचारवंतांमध्येंसुद्धां कांहीं असे असतात कीं ज्यांना मानवी स्वभावाच्या यथार्थ ज्ञानाची आवश्यकता पटलेली असते, पण त्याकरितां आत्मनिरीक्षणाची कांहीं जरुरी आहे असें वाटत नाहीं. त्यांना असें वाटतें कीं, काव्यें, नाटकें, कादंबऱ्या व इतरांचीं आत्मकथनें यांच्या वाचनांतून आपणांस मानवी स्वभावाचें बरोबर ज्ञान होईल. त्यांच्या ध्यानांत येत नाहीं कीं काव्यें, नाटकें आणि कादंबऱ्या ह्यांच्या कथानकांतील बराच भाग पूर्वीच्या वाङ्मयांत तर काल्पनिक असेच, पण आधुनिक वाङ्मयावरहि, त्याचे कांहीं निर्माते आपणांस जरी वास्तववादी म्हणवीत असले तरी, लेखकांच्या कल्पनांचीच छाया अधिक प्रमाणांत पडलेली पाहावयास सांपडते. वाङ्मयांत आधुनिक ध्येयवाद आणला कीं झालें तें वाङ्मय वास्तववादी, हा कांहीं लेखकांचा भ्रम होय. आधुनिकता व वास्तवता ह्यांचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं. जुनें वाङ्मय जुन्या कल्पनांनीं व ध्येयांनीं भारावलेलें आढळतें तर नवें नव्या कल्पनांच्या व ध्येयांच्या मुलाम्यानें मढविलेलें दिसून येतें. जुन्या अथवा नव्या वाङ्मयांत वास्तवता मुळींच नसते आणि वाङ्मयांत कल्पनांना कांहींच स्थान नसावें, असें म्हणण्याचा हेतु नाहीं. मानवी स्वभावाचें यथार्थ ज्ञान होण्यास जरूर इतकी वास्तवता त्यामध्यें सामान्यतः नसते एवढेंच म्हणावयाचें आहे. आत्मकथनांचेंहि स्वरूप कांहीं अपवाद सोडतां (उदा. गु. कर्वे व म. गांधी यांचीं आत्मकथनें) असावें तसें वास्तववादी नसते. हें विधान विरोधाभासात्मक वाटेल. आत्मकथन म्हणजे लेखकाच्या स्वतःच्या जीवनांतील घडलेल्या वृत्तांचें कथन आणि तेंहि असावें तसें वास्तवपूर्ण नसतें हें म्हणणें कानाला कसेंसेंच वाटेल. पण तें सत्य आहे. बहिर्मुखतेची छाप तेथेंहि दुर्दैवानें पडलेली पाहावयास सांपडते. अनेक आत्मकथनें आत्मप्रौढीनें ओथंबलेलीं असतात. त्यामुळें त्या त्या जीवनांतील सत्य फारच थोडें हातीं लागतें. वास्तवता प्रामुख्यानें आहे अशीं काव्यें नाटकें व कादंबऱ्या आणि ज्यांत सत्यच नमूद केलेलें आहे अशीं आत्मकथनें जेव्हां समाजापुढें येतील, तेव्हां तीं मानवी स्वभावाचें सम्यक् ज्ञान होण्यास मदत करतील. परंतु त्याकरितां कोणी थांबून राहण्याचें कारण नाहीं. ज्याचें त्यानें निरीक्षण केल्यास स्वतःविषयीं होणाऱ्या ज्ञानाच्या आधारें मानवी स्वभावाची यथातथ्य कल्पना करतां येते. कारण मनुष्यस्वभाव थोड्या बहुत फरकानें सर्व व्यक्तींमध्यें एकाच स्वरूपाचा आढळून येतो.

## मानसशास्त्राच्या अभ्यासाची आवश्यकता

हें आत्मनिरीक्षण चांगलें होण्याच्या दृष्टीनें आत्मनिरिक्षिकास मानसशास्त्राचें कांहीं ज्ञान असणें जरूर असतें. ह्या जगांत मन म्हणून कांहीं नसून सर्वत्र जडच भरलेलें आहे ह्या कल्पनेपासून, हें जग केवळ मनाचेंच बनलेलें आहे ह्या कल्पनेपर्यंत, विविध कल्पना मनोविषयक तत्त्वज्ञानांत आढळून येतात. केवळ जडाचें अस्तित्व मानणारे सर्व जीवांना आणि अर्थातच मानवांना यंत्राच्या भूमिकेंत नेऊन सोडतात, मानवांचें कर्तृत्व नाकबूल करतात. घड्याळाची स्प्रिंग फिरवून ठेविली म्हणजे ती पूर्णपणें सुटेपर्यंत घड्याळाचे कांटे फिरण्याची क्रिया होत असते व घड्याळाला जणुं कांहीं कर्तृत्व आहे असें आपणांस वाटतें. वस्तुतः घड्याळाकडे कर्तृत्व असें कांहींच नसतें. तद्वत् मानवी जीवनांतील मानवाचें कर्तृत्व आभासात्मक आहे असें ह्यापैकीं कांहींचें म्हणणें असतें. अर्थातच ह्यांच्या मतें मानवी मन म्हणून कांहीं नाहीं. ह्याच्या उलट ज्यांना अस्तित्व आहे अशा मानल्या गेलेल्या सृष्टींतील अनेक अचेतन व सचेतन वस्तू—आकाश आणि तारे, समुद्र आणि नद्या, डोंगर आणि जमीन, हत्ती आणि मुंग्या—ह्या सर्व केवळ मनाचे खेळ होत असें समजणारे तत्त्ववेत्ते आहेत. ह्यांच्या मतें मानवी शरीर म्हणून कांहीं नाहीं. तिसरा एक पक्ष असा आहे कीं ज्याच्या मतें मन आणि शरीर हीं एकाच आद्यतत्त्वाचीं भिन्न स्वरूपें होत; पण एक सूक्ष्म व दुसरें स्थूल असल्यामुळें व्यवहारतः आपण तीं अगदीं निराळीं मानतों. ह्या मतावर आजच्या विचारवंतांची एकवाक्यता होऊं पाहत आहे. सूक्ष्म आणि स्थूल, मन आणि शरीर ह्यांचें एकेकाळीं








मानल्याप्रमाणें केवळ सहप्रवाहित्व नसून परस्परावलंबित्व आहे ही कल्पना इंद्रियविज्ञानवेत्त्यांना मानसशास्त्रज्ञांना आणि तत्त्वज्ञान्यांना अधिक अधिक प्रमाणांत पटत चाललेली आहे. आणि ह्या परस्परावलंबित्वांत मौलिक एकरूपतेचें बीज आहे. ही एकरूपता पटवून घेणारे अचेतन व सचेतन ह्या भेदांना फांटा देऊन जीवमात्रांनाच काय, पण सृष्टींतलि अस्तित्वमात्रास मन आहे व त्याच्या ठायीं कांहीं कर्तृत्व आहे असें कबूल करतात.

मनोविषय कल्पनांच्या ह्या आत्यंतिक टोकांच्या न्याय्यान्याय्यतेचा विचार करीत बसण्याची ह्या लेखांत आवश्यकता नाहीं. मानव हा कांहीं एक मनरहित यंत्र नव्हे, त्याला मन आहे आणि तें मनहि एखादी कर्तृत्वरहित रचना नसून त्याच्या ठिकाणीं कर्तृत्व आहे ही कल्पना एतद्विषयक आधुनिक कल्पनांचा सुवर्णमध्य होय. आणि तिच्याशींच आपणांस येथें कर्तव्य आहे, मनामुळें मानवाला व्यक्तित्व प्राप्त होतें. व्यक्तित्वाचे आंतरिक व बाह्य असे दोन भाग मानल्यास मन ह्या दोन भागांचा मध्यबिंदु होय. ह्या त्याच्या स्थानामुळें आत्मनिरीक्षकानें मानसशास्त्राचा अभ्यास करणें आवश्यक आहे हें ध्यानांत येईल.

मनाची रचना, मनाच्या क्रिया आणि मानसिक चमत्कार ह्यांचा अभ्यास करतांना अभ्यासकाची भूमिका शास्त्रीय राहिली पाहिजे. ती सुटली तर तो अंधश्रद्धेच्या व अनावश्यक गूढतेच्या जाळ्यांत सांपडल्याशिवाय रहाणार नाहीं. हर्बर्ट स्पेन्सर एके ठिकाणीं म्हणतात त्याप्रमाणें, एखाद्या गोष्टीचें सत्य प्रत्ययास येईपर्यंत त्या गोष्टीवर विश्वास नाहीं व अविश्वासहि नाहीं अशी भूमिका प्रत्येकानें ठेविली पाहिजे. मानवाचें मन सरळ, उघडें व मोकळें असलें पाहिजे. पण तें भोळें नसलें पाहिजे. मानवाचें व्यक्तित्व आणि त्याच्या मनाचें निर्मायकत्व अभ्यासकानें नीट समजून घेतलें पाहिजे. मनाचें कर्तृत्व अथवा सामर्थ्य ही अजब चीज आहे.

## व्यक्तित्वाचा पाया.

मानवाचें व्यक्तित्व म्हणजे त्याचे मानसिक ( व नैतिक ) गुण होत. मनाचा विचार दोन रीतींनीं करावा लागतो : शरीरात्मक व प्रवृत्त्यात्मक. ज्या मेंदूच्या द्वारें मनाचीं कार्यें चालतात त्याची रचना निरामय असली पाहिजे. ती तशी असली तरच मनाकडून होणारें ज्ञानग्रहणाचें, ज्ञानसंचयाचें व ज्ञानोपयोगाचें कार्य चांगलें होऊं शकतें. आणि तें चांगलें होऊं शकलें तरच मनाच्या ठायीं नैतिक गुण संभवतात. मेंदूची निरामयता त्याच्या स्वतःच्या निर्दोषतेवर जशी अवलंबून असते तशी ती शरीराच्या इतर इंद्रियांच्या व भागाच्या निर्दोषतेवरही अवलंबून असते. हा झाला शरीरात्मक विचार. मानवाच्या ठायीं कांहीं मूलभूत प्रवृत्ती आहेत. त्या सर्व मिळून मानवाचें व्यक्तित्व बनत असतें. त्यांचा विचार म्हणजे प्रवृत्त्यात्मक विचार होय. ह्या नैसर्गिक प्रवृत्तींना उपजतवृत्ति किंवा सहजप्रेरणाहि म्हणतात. ( कोणी ह्यांना जन्मसिद्ध वर्तनप्रबंध असेंहि म्हणतात. ) ह्या प्रवृत्ती जोरदार असतात. ह्यांना व्यत्यय आल्यास मानसिक आरोग्याचा अभाव व अस्वाभाविक वागणूक निर्माण होतात. पोषण, संचय, संरक्षण, रचना, संघटन, लैंगिकता, वात्सल्य, आत्मप्रस्थापना, क्रोध, भय, असहायता, त्याग, शरणागति, उपहास, आक्रंदन व आत्मनाश अशा अनेक मूलभूत प्रवृत्ती आहेत. ह्यांपैकीं आत्मनाशाची प्रवृत्ति वादग्रस्त असली तरी बाकीच्या सर्वांचें अस्तित्व कोणासहि सहज पटण्यासारखें आहे. ह्या अनेक प्रवृत्तींचें बीज चार प्रवृत्तींमध्यें आहे. लैंगिकता, संघशलिता, पोषण व रक्षण ह्या त्या चार होत. पुनः ह्या चारींमध्यें लैंगिकता अति प्रबल व म्हणून अति महत्त्वाची होय. ह्या मूलभूत प्रवृत्तींपैकीं कोणत्याहि प्रवृत्तिस व्यत्यय आल्यास अथवा ती दुखावली गेल्यास मनाचें आरोग्य बिघडतें, मानसिक रोग निर्माण होतात. परंतु लैंगिक प्रवृत्ति दुखावली गेल्यास मनाची विकृति विशेषच प्रत्ययास येते. मनाची निरामयता व नैतिकता हा व्यक्तित्वाचा पाया असल्यामुळें मन विकृत होणें म्हणजे तेवढ्या प्रमाणांत व्यक्तित्व विकृत होणें होय.

मानवाचें व्यक्तित्व तयार होण्यांत लैंगिक प्रवृत्तिला मोठें स्थान असलें तरी इतर प्रवृत्तींही कमी अधिक प्रमाणांत प्रभावी असतातच. उदा. संघशलिता. ही नियामक प्रवृत्ति असून नीतिचे नियम व दंडक








ह्यांची ती जननी होय. आपण एखादी संस्था निर्माण करतों व तिचे नियम पाळतों. ह्याच्या मुळाशीं हीच प्रवृत्ति असते. समाजाकडून आपलें नियमन अनेक रीतींनीं होत असतें. त्या सर्व रीतींच्या मागें हीच प्रवृत्ति प्रामुख्यानें असते. ही दुखावली गेली तरीहि मन विकृत होण्याचा संभव असतो.

## जाणीवेच्या पलीकडील मूलप्रवृत्ती

मानवांच्या ठायीं ह्या प्रवृत्तींना अनुसरून मज्जा-तंतुव्यवस्थेंत जी विशिष्ट रचना निर्माण झालेली आहे ती निर्माण होण्यास असंख्य वर्षें लागलीं आहेत. तिच्यांत बदल करावयाचा म्हटलें तर तो सहज होणारा नाहीं. त्याचप्रमाणें मानवी मनाचा विशिष्ट नमुना तयार होण्यास दीर्घकालीन धार्मिक कल्पनांचे व विधींचे संस्कार कारणीभूत होत असतात. ( ते संस्कार सहज पुसून टाकतां येण्यासारखे नसतात हें धर्मांच्या इतिहासांवरून कळून येतें. ) मानवी जीवन हें एकाकी जीवन नसल्यामुळें कौटुंबिक व सामाजिक घटनांचाहि मानवी मनावर परिणाम झालेला असतो. हें सर्व खरें असलें तरी व्यक्तित्वाचें हें वर्णन बाह्यच होय. निरोगी मज्जातंतुव्यवस्था व इतर व्यवस्था आणि योग्य कौटुंबिक, सामाजिक व धार्मिक संस्कार यांच्या एकत्रीकरणानें संपूर्ण व्यक्तित्वाची कल्पना येत नाहीं. व्यक्तित्वांत त्यापेक्षां कांहीं अधिक असतें. जाणीवेच्या अथवा बुद्धिगत क्रियांच्या पलीकडे कांहीं मानसिक क्रिया चालू असतात.

संपूर्ण व्यक्तित्व कळण्यास आपणास ह्याहि क्रियांचा विचार केला पाहिजे, मनाचें चांगलें विश्लेषण झालें पाहिजे. स्वाभाविक व्यक्तित्वाची एकदां यथार्थ कल्पना आली म्हणजे अस्वाभाविकाची सहजच येईल. जाणीवेच्या अथवा बुद्धिगत क्रियांच्या पलीकडील मानसिक क्रिया म्हणजे मूलप्रवृत्तिगत क्रिया होत. बुद्धि व मूलप्रवृत्ती एकमेकापासून विलग मानतां येतील असा मात्र याचा अर्थ नाहीं. बुद्धि व मूलप्रवृत्ती संलग्न आहेत, परस्परावलंबी आहेत. मानवी जीवन बुद्धिगत व मूलप्रवृत्तिगत असें द्विविध आहे. केवळ बुद्धिगत अथवा केवळ मूलप्रवृत्तिगत असें एकविध जीवन कोणाचेंहि नसतें.

## मनोयंत्राचे कांहीं सिद्धान्त

आतां मनाचें नीट विश्लेषण करतां येण्याच्या दृष्टीनें आपण मनोरूपी यंत्राचा थोडा विचार करूं. मानसशास्त्रज्ञांकडून एतद्विषयक मांडल्या गेलेल्या सिद्धांतांमध्यें कांहीं मूलभूत व कांहीं दुय्यम आहेत.

अ. मूलभूत सिद्धान्त—

(१) मानसिक क्रिया नियमबद्ध असतात. ह्या क्रियांमध्यें अनियामित असें कांहींच नसतें. कार्यकारणभाव येथेंहि आढळतो. विश्लेषण केल्यास प्रत्येक बाब सकारण ठरते. बोलतांना होणारी जिभेची चूक, एकदम झालें असें वाटणारें विस्मरण, हातांचे अनावश्यक भासणारे चाळे, बाह्य कारण कांहींहि न घडतां एकाएकीं आ करून आकाशाकडे बघणें, केंस विंचरल्यासारखी नखांची क्रिया होणें, ह्या सर्वांच्या मागें कांहीं तरी कारण असतेंच.

(२) मनाचा ( जाणीवेप्रमाणें ) एक अजाणीवेचा प्रदेश असतो. त्यास कोणी अबोध मन अथवा गूढ मन म्हणतात. हा प्रदेश केवळ जुन्या स्मृतींचा सांठा नव्हे. मानसिक जीवनाचा तो अत्यंत क्रियावंत व जाज्वल्य प्रदेश होय.

मूलप्रवृत्ति अथवा जन्मसिद्ध वर्तनप्रबंध येथेंच वास्तव्य करतात आणि ते सबंध मनाला चालना देतात. ह्यांचें अस्तित्व बरेंचसें स्वयंपूर्ण असतें. हे बाह्य जगापासून अथवा वास्तवतेच्या जगापासून स्वतंत्र राहतात. पण सर्वसाधारण मानवी जीवनावर आपला प्रभाव सतत चालवितात. मूलप्रवृत्तींपैकीं लैंगिकता प्रबळ असल्यामुळें अबोध मनांतील क्रियांना ती अत्यंत गतिमान् करते हें निराळें सांगावयास नकोच.

अबोध मनांतील क्रिया स्वयंपूर्ण असल्यामुळें म्हणजे त्या वास्तवतेपासून स्वतंत्र राहणाऱ्या असल्यामुळें तेथें स्वैर विचारांचें जीवन चालू असतें. अर्थातच तेथें तर्कशास्त्राची अवगणना होते व परस्परविरोधी विचारांचें थैमान होऊं शकतें. उदा० प्रेम व द्वेष, मान व अवमान, विश्वास व विश्वासघात, इत्यादि विरोधी विचार. एकाच माणसाबाबत एका क्षणांत प्रेम तर दुसऱ्या क्षणांत द्वेष वाटत असल्याचें एखाद्या वेळेस आपल्या प्रत्ययास येत नाहीं काय ? हे परस्परविरोधी








विचार अजाणीवेच्या प्रदेशांत अथवा अबोध मनांत वर्षानुवर्षें राहतात आणि मानवाच्या व्यक्तित्वावर त्यांचा परिणाम होणें संभवनीय असतें.

(३) वरील दृष्टीनें पाहतां जाणीवेचा प्रदेश अथवा बोधमन मानसिक जीवनाचें जणुं कांहीं बाह्य ज्ञानेंद्रिय ठरतें. बोधमन मुख्यतः वास्तवतेच्या जगाशीं संलग्न असलें तरी तें स्वैर विचारांच्या जगाशीं म्हणजे अबोध मनाशीं स्पर्श करून असतें.

ब. दुय्यम सिद्धांत—

(१) कल्पना. ह्या अबोध मनांत राहतात. ह्यांचीं मुळें बालपणापर्यंत मागें शोधतां येतात. (उदा० देव, पिशाच्च, धर्मभक्ति, इत्यादि विषयींच्या कल्पना.) ह्या कल्पना वेळोवेळीं बोधमनांत उसळून वर येतात. त्यांना प्रतिबंध झाल्यास त्या मागें ढक-लल्या जाऊन अबोधमनांत दडपल्या जातात.

(२) गंड. उपर्युक्त निरोधित कल्पना विकारानें पूर्णपणें भारावल्या गेल्यास यांचे अनेक गंड बनतात. हे मनोगंड निरनिराळ्या प्रकारचे व महत्वाचे असतात. मानवी व्यक्तित्वाचे नमुने ह्या गंडांमुळें निर्णीत होतात. निरनिराळ्या माणसांमध्यें आढळणाऱ्या धार्मिक, राजकीय, राष्ट्रीय, इ. वृत्तींच्या प्रकारांमागें हे गंड असतात. हे गंड बोधमनांतील क्रियांशींच विसंगत होऊं शकतात असें नव्हे तर अबोधमनां-तील स्वतःच्या क्षेत्रांतहि परस्परांशीं विसंवादी होऊं शकतात.

(३) निरोधक. मनोयंत्रांतील निरोधकांची योजना विसंवादांना बोधमनांत न येऊं देण्याकरितां आहे. अर्थात् ह्या योजनेमुळें विसंवादी विचार व गंड दडपले जातात.

## मनाचे तीन नमुने

गंडांगंडांतील द्वंद्व मानवी मनांत नित्य चालू असतें. ह्या द्वंद्वामुळें मनाचे सामान्यतः तीन मूलभूत नमुने तयार होतात. स्थिर व न लवणारें; स्थिर परंतु लवणारें; अस्थिर.

पहिल्या नमुन्याचें मनः—कसलाहि युक्तिवाद, कोणत्याहि भावना (देशभक्ति, धर्मश्रद्धा, इ.) अशा मनास स्वार्थत्याग करण्यास उद्युक्त करूं शकत नाहींत. अशा मनांत स्वार्थच प्रभावी असतो. देश-भक्ति म्हणजे ढोंग, धर्मश्रद्धा म्हणजे सोंग इत्यादि खोटीं लेबलें त्या त्या कार्यास लावून हें मन मोकळें होईल. गंडांना तें बोधमनांत येऊं देईल व तेथेंच त्यांना बंदिस्थ करून टाकील, त्यांचें विलगीकरण करील.

दुसऱ्या नमुन्याचें मनः—हें स्थिर परंतु लवचिक असल्यामुळें अनुभवाशीं मिळतें घेईल व विसंवादी गंडांमध्यें तडजोड घडवून आणील.

तिसऱ्या नमुन्याचें मनः—हें गंडांना बोधमनांत न येऊं देतां अबोधमनांतच त्यांना दडपून ठेवील. बोधमनांत त्यांना येऊं न दिल्यामुळें त्यांना विलग करणें, त्यांच्याशीं मिळतें घेणें किंवा त्यांची तड-जोड करणें, इत्यादि क्रियांना तें सवडच ठेवीत नाहीं.

ह्या तीन नमुन्यांच्या अलीकडील, पलीकडील व मधील असे अनेक नमुने पाहावयास सांपडतील. इतकेंच काय पण एकाच व्यक्तींत निरनिराळ्या नमुन्यांचीं मिश्रणें आढळून येतील.

## समतोल व्यक्तित्व

मनाच्या अबोध व बोध भागांतील स्वैरता व वास्तवता यांच्या विविध क्रियांचा मेळ घालून समतोल निर्माण करण्याचा लहानपणापासून पुनः पुनः प्रयत्न चालू असतो व असावयास पाहिजे. तारुण्यांत तो अधिक यशस्वी होऊं शकतो. अनुभव, बुद्धि, युक्तिवाद, स्मरण व संयम ह्यांच्या साहाय्यानें व्यक्तित्वाला आकार देण्याची व तें चांगलें बन-ण्याची संधि तारुण्यांत भरपूर असते. समतोल व्यक्तित्वाचा पाया घालण्याची तारुण्य हीच वेळ होय. तारुण्यांत हा प्रयत्न यशस्वी न झाल्यास एकदम मनोविकृती निर्माण होतातच असें नाहीं. मानवी मन विकृती टाळण्याकरितां व जीवन यशस्वी करण्याकरितां समतोलाच्या अभावीं इतर कमी दर्जाच्या साधनांचा अवलंब करून पाहतें. उदा.आपल्या दोषांचें खापर दुसऱ्यावर फोडून अथवा आपले दोष दुसऱ्यांवर फेकून तें खोटें समाधान प्राप्त करून घेतें. ह्याला प्रक्षेपण म्हणतात. सार्वजनिक

[पान २० पहा.








# मराठी रंगभूमीचे गुणविशेष

प्रा. श्री. ना. बनहट्टी

गेलीं शंभर वर्षें महाराष्ट्रानें रंगभूमीची अतुलनीय प्रेमानें जोपासना केली, ही गोष्ट सिद्धवत् आहे. हें प्रेम, हा जिव्हाळा, ही लालनाची वृत्ति, मराठी जनतेंत रंगभूमिच्या अंगच्या कोणच्या लक्षणांमुळें उत्पन्न झाली, याचें निरीक्षण रंगभूमीच्या इतिहासाचें निरूपण करावयास प्रारंभ करण्यापूर्वीच करणें इष्ट होईल.

## मराठी रंगभूमीचें 'देशी'पण.

मराठी रंगभूमि हा सर्वस्वी देशी वाण आहे. इंग्रजी अंमल सुरू झाल्यानंतर आमच्या समाज-जीवनांत ज्या ज्या गोष्टी उत्पन्न झाल्या, त्या त्या इंग्रजी संस्कृतीची व इंग्रजी कल्पनांची डूब दिलेल्या अशा स्वरूपांत आमच्यापुढें आविर्भूत झाल्या. इंग्रजी अंमल सुरू होतांच शिक्षण इंग्रजी तऱ्हेवर गेलें, वाङ्मय इंग्रजी वेषांत आविर्भूत झालें; फार काय, शिकलेल्या लोकांचे विचार इंग्रजी कल्पनांनीं भारावून गेले आणि त्यांच्या आचारांवरही इंग्रजी पद्धतीचा पगडा बसूं लागला. या अव्वल इंग्रजीच्या काळांत कलेच्या क्षेत्रांतच काय तें आमच्या हटेल मराठी मनानें आपलें स्वत्व कायम ठेवलें. कलांमध्यें देखील निर्भेळ देशी साजांत आविर्भूत होणारी अशी नाट्यकला ही एकच ठरली. चित्रकला किंवा शिल्पकला पूर्वपरंपरेनें चालत आलेली स्वतःची अशी महाराष्ट्राला नव्हती. आणि इंग्रजी अंमलाच्या सुरवातीस तिचा वैशिष्ट्यपूर्ण स्वरूपांत उदय झाला असेंहि म्हणतां येत नाहीं. गायनकलेच्या बाबतींत महाराष्ट्रानें मुळांत हिंदुस्थानी संगीताचें अनुकरण करून पुढें त्या आधारावर मोठेंच स्थित्यंतर घडवून आणलें असलें, तरी ही गोष्ट पुष्कळच पुढची. नाट्यकला ही त्यापूर्वीच जन्मास येऊन उफाड्याच्या मुलप्रमाणें जोमानें वाढीसही लागली होती.

मराठी रंगभूमि ही कानडी नाट्यकलेच्या उदाहरणावरून निर्माण झाली, असें खुद्द विष्णुदास भावे यांच्या विधानावरूनच दिसून येतें. तेव्हां मराठी रंगभूमि हा देशी वाण कसा, असा प्रश्न कांहींजणांच्या मनांत उत्पन्न होईल. 'देशी' व 'परकी' या शब्दांच्या अर्थासंबंधानें आपण योग्य तारतम्य राखलें पाहिजे. कर्नाटकी नाट्यकला किंवा हिंदुस्थानी संगीत यांना परकी म्हणणें शोभणार नाहीं. 'मराठी रंगभूमि हा देशी वाण आहे' असें म्हणण्यांतला मुद्दा हाच कीं आमची रंगभूमि परकी म्हणजे इंग्रजी रंगभूमीच्या अनुकरणानें किंवा इंग्रजी नाट्याच्या आवडीमुळें निर्माण झालेली नसून ती इंग्रजी नाट्याचा किंवा इतर कोणत्याही इंग्रजी कलांचा गंधही नसलेल्या अस्सल देशी मनांनीं मुळांत निर्माण केली. कथानकें समाजाच्या हाडींमासीं खिळलेल्या जुन्या पुराणांतील, नाटकरचना करणारे लोक इंग्रजी शिक्षणाचा गंधही नसलेले शास्त्री–पुराणिक किंवा संस्थानिकांचे आश्रित, नाटक करून दाखविणारीं पात्रेंहि दशग्रंथी वेदमूर्तीपासून तों आचारी, पाणके, ताक्ये यांपर्यंत जुन्या सरंजामदार लोकांच्या आश्रित वर्गांतील, नाटकांतील गाणें जुन्या हरदासी पद्धतीचें, टाळमृदंगाच्या साथीनें गायिलें जाणारें, पात्रांच्या रंगाचें सामान








कोळसा, सफेता, पिवडी, यांसारखें निवळ स्वदेशी, रंगपठाची सजावट म्हणजे अलवणाचे व खाराव्याचे सरक–पडदे आणि या सर्व नाट्यसंभाराचे प्रेक्षक म्हणजे आमची खेड्यापाड्यांतली साधीभोळी स्त्रीपुरुषमिश्र आबालवृद्ध जनता. अशा स्वरूपांत आमची रंगभूमि प्रथमतः अवतीर्ण झाली. पुढें तिनें वयाच्या विकासाबरोबर अनेक रंगढंग केले, हें खरें. परंतु ते त्या त्या वेळच्या समाजस्थितींत पूर्ण आत्मीय व देशी म्हणून गणले जाण्याजोगे असेच होते, हें पुढें आपण जो इतिहास पाहणार आहों त्यांवरून दिसून येणारच आहे. तात्पर्य, मराठी रंगभूमीचें 'देशीपण' सहसा तिला पारखें झालें नाहीं. हें आमच्या जनतेनें तिचे अपरिमित लाड करण्याचें एक प्रमुख कारण होय.

## भारतीय एकतेचें प्रतिबिंब

आमच्या रंगभूमीचें दुसरें विशिष्ट लक्षण म्हणजे भारतीय एकतेचें सोज्ज्वल प्रतिबिंब अगदीं प्रारंभापासून तिजमध्यें पडलेलें दिसतें, हें होय. आमचें वाङ्मय हें निव्वळ मराठी वाङ्मय आहे, म्हणजे तें केवळ महाराष्ट्रीयांकरितां व महाराष्ट्रीयांपुरतेंच आहे. त्यांतहि त्याची पोच शहरी सुशिक्षित लोक व पांढरपेशा समाज यांच्यापुरतीच बहुतांशीं आहे. परंतु आमच्या नाट्याचा परिघ इतका आकुंचित कधींच नव्हता व नाहीं. महाराष्ट्रीयांनीं आपली नाट्यकला केवळ महाराष्ट्रीयांकरितां म्हणून कधींच प्रदर्शित केली नाहीं. नाट्याचा प्रेमी व नादी जो जो येईल तो आपला, असें प्रारंभापासून आमच्या कलाकारांनीं मानिलें. अगदीं पहिले नाटककार विष्णुदास भावे आपली नाटक मंडळी घेऊन मुंबईस गेले, तेव्हां मुंबईंतील मराठी लोकांप्रमाणेंच गुजराथी, पारशी व मुसलमान नाट्यप्रेमी मंडळी त्यांचें कौतुक करण्यास त्यांच्याभोंवतीं गोळा झाली. आणि अठरापगड समाजास समजेल असें नाटक आपण केलें पाहिजे, या भावनेनें त्यांनीं तेथल्या तेथें हिंदुस्थानींत 'गोपीचंद' नांवाचें नाटक रचून त्याचा प्रयोग करून तेथील भिन्न भाषांच्या व जातींच्या समाजांकडून वाहवा मिळविली. मुंबईस विष्णुदासांच्या भोंवतीं गोळा झालेल्या नामवंत मंडळींमध्यें डॉ. भाऊ दाजी, नाना शंकर शेट इत्यादि थोर महाराष्ट्रीयांप्रमाणेंच सर जमशेटजी जीजीभाई, भाऊ रसूल, गोकुळदास देवजी, जीवनजी महाराज इत्यादि पारशी, गुजराथी व मुसलमान समाजांतील प्रमुख मंडळीहि होती. विष्णुदासांच्या नंतर पौराणिक खेळ करणाऱ्या ज्या कंपन्या निघाल्या त्यांच्या व्यवहारांत व आचरणांत तर भारतीय एकतेचें तत्त्व पूर्णतया प्रतिबिंबित झालेलें दिसतें. किंबहुना हा महाराष्ट्र व तो गुजराथ, तो कर्नाटक, तें तेलंगण, अशी प्रादेशिक परकेपणाची जाणीवच त्यांजमध्यें नव्हती असें म्हटलें तरी चालेल. ज्यांना साधलें, जमलें व झेपलें त्यांनीं महाराष्ट्राबाहेर विशाल भारतांत संचार करण्यास मुळींच मागेपुढें पाहिलें नाहीं. भास्करराव मराठे यांची सांगलीकर हिंदु नाटककारमंडळी, राघोपंतांची इचलकरंजीकर मंडळी, नरहरबुवांची चित्तचक्षुचमत्कारिक कोल्हापूरकर नाटकमंडळी-यांनीं महाराष्ट्राबाहेर अकुतोभय संचार केला असल्याचें दिसून येतें. भास्करराव मराठे यांच्या सांगलीकर मंडळीचा संचार तर महाराष्ट्रापेक्षां बाहेरच्या प्रांतांतच जास्त होई. नरहरबुवांनीं आपल्या चित्तचक्षुचमत्कारिक मंडळीला अक्षरशः काशीपासून रामेश्वरपर्यंत हिंडवून महाराष्ट्रीयांच्या नाट्यकौशल्याची विजयपताका सर्व भरतखंडभर मिरविली. भारतीय एकतेचा हा विशाल दृष्टिकोन आकुंचित करण्यास जर कोणी कारणीभूत झाले असतील तर ते महाराष्ट्रांतील पांढरपेशा वर्गांतले आंग्लविद्याविभूषित लोकच होत. तथापि अशा लोकांचा भेदावर भर देणारा एकदेशीय दृष्टिकोन आमच्या नाट्यसृष्टीवर फारसा प्रभाव पाडूं शकला नाहीं. पौराणिक नाटकांनीं ज्याप्रमाणें भाषाभिन्नतेच्या अडचणींस न जुमानतां सर्वतोदूर भरारी मारली त्याप्रमाणें पुढें किर्लोस्करवळणावरील संगीत नाट्यानेंहि महाराष्ट्राबाहेरची हवा पुष्कळच पाहिली आहे. खुद्द किर्लोस्कर नाटक मंडळी आणि कै. भाटे बोवांची नाट्यकलाप्रवर्तक नाटकमंडळी यांनीं महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर उर्दू नाटकें करून दाखविण्याचा कांहीं काळ धडाका चालविला होता, हा इतिहास अलीकडचा आहे. महाराष्ट्रीय नाटककारांनीं हिंदी अगर उर्दू नाटकें रचल्याचीं उदाहरणें अगदीं विरळ आहेत असें नाहीं. जुन्या जमान्यांतले भास्करराव मराठे यांनीं तिसांवर नाटकें हिंदी भाषेंत रचलीं असल्याची माहिती मिळते. याच्या उलट








पैगंबरवासी मुनशी अब्बासअल्ली यांजकडून उर्दू नाटकें लिहून व बसवून घेऊन त्यांच्या पदरांत हजारों रुपये आमच्या कंपन्यांनीं खुशीनें ओतले ही गोष्टहि लक्षांत ठेवण्याजोगी आहे. मराठी नाटकांमध्यें प्रसंगवशात् घातलेलीं हिंदी, उर्दू व गुजराथी या भाषांतील भाषणें तर शेंकड्यांनीं आढळतील. खुद्द मराठी रंगभूमिची सुरुवात झाली ती कानडी रंगभूमीच्या अनुकरणानें नसली तरी उदाहरणानें झाली हें सुप्रसिद्ध आहे. पुढें तिच्या जीवनविकासांत अनेक वेळां अनेक बाबतींमध्यें उर्दू व गुजराथी रंगभूमीनें तिजवर परिणाम केला हेंहि सत्य लपण्याजोगें नाहीं.

तात्पर्यार्थ हाच कीं, विविधतेंत एकता पाहणारा भारतीय संस्कृतीचा जो व्यापक व विशाल आत्मा, तोच आमच्या या मराठी रंगभूमीच्या हृदयकोशांत स्फुरत असून त्यामुळें तिचें चरित्र व चारित्र्य भारतीयत्वाच्या भावनेनें भरलेलें, सर्वसंग्राहक व विशाल असें झालेलें आहे. म्हणून महाराष्ट्रीय सुशिक्षितांची दुसरी कोणचीहि हालचाल अगर चळवळ असली कीं साशंक चित्तानें कान टवकारणारे हिंदी, गुजराथी अगर इतर प्रांतांतील लोक नाटक म्हटलें कीं तेथें निःशंक मनानें गोळा होतात, नव्हे जिव्हाळ्याच्या प्रेमानें उड्या घालतात, हा अनुभव सर्वत्र येतो.

## ' एषा जातिः परित्यक्ता '

भारतीय एकतेचें तत्त्व हें ज्याप्रमाणें आमच्या रंगभूमींत प्रथमपासूनच अवतरलें त्याचप्रमाणें महाराष्ट्रीयांच्या सामाजिक एकतेचेंहि ती एक साधन किंवा द्वार बनली, हाहि तिचा गुणविशेष लक्षांत घेण्याजोगा आहे. पांढरपेशा समाज हा प्रामुख्यानें बुद्धिजीवी असल्यामुळें नाट्यासारख्या बौद्धिक श्रमांवर अवलंबून असलेल्या कलेच्या उपासनेंत तोच मोठ्या प्रमाणांत सामील व्हावा हें अपरिहार्य होय. अर्थात् नाटककार काय, नट काय, किंवा व्यवस्थापक काय, व्यावसायिक रंगभूमिच्या हरएक विभागांत ब्राह्मण व इतर पांढरपेशा जाती याच प्रामुख्यानें शिरलेल्या अगर घुसलेल्या आढळाव्या, हें क्रमप्राप्तच आहे. परंतु ही गोष्ट स्वाभाविक असली तरी तशा तऱ्हेची अटक व जातीय भेदभावना प्रत्यक्ष आचरणांत तर राहोच, परंतु मनामध्यें देखील रंगभूमीच्या क्षेत्रांत कोणी मानीत नाहीं, कोणास मानून चालत नाहीं. कर्णाशीं कलहाचा प्रसंग प्राप्त झाला असतां अश्वत्थाम्यानें युद्धव्यवहारामध्यें समपातळीवर येण्यासाठीं " एषा जातिः परित्यक्ता " अशी घोषणा केली. त्याचप्रमाणें रंगभूमीच्या परिसरांत येणारा मनुष्य जणूं काय अबोधपूर्व रीतीनें " ही म्यां जात टाकली पहा " असें म्हणत असतो. जातीय भावनांस विलुप्त करणारा रंगभूमीचा अशा तऱ्हेचा विलक्षण प्रभाव तिच्या इतिहासांत अनेकवार दृष्टोत्पत्तीस आला आहे. उदाहरणादाखल एक घटना अत्यंत लक्षणीय अशी येथें सांगण्याजोगी आहे. पन्नास वर्षांपूर्वी कोल्हापुरास स्थापन झालेली स्वदेशहितचिंतक नाटकमंडळी ही त्या काळांतील मोठी प्रतिष्ठित व नांवाजलेली कंपनी. कंपनींतील वागणूक पूर्णपणें जुन्या धर्मकल्पनांस अनुसरून, सध्यां ज्याला ' सनातनी ' असें म्हटलें जातें, तशा प्रकारची. अर्थात् कंपनीमध्यें सर्वस्वीं ब्राह्मणांचें प्राधान्य ! असें असूनही, ब्राह्मण व ब्राह्मण्य यांजवर हत्यार घेऊन ब्राह्मणेतरांच्या कैवाराचें कंकण हातीं बांधलेल्या करवीरकर शाहू छत्रपतींचा आश्रय प्रस्तुत मंडळीनें संपादिला व टिकाविला होता ! रंगभूमीच्या क्षेत्रांत जातीय भावना पार विरघळून जात याचें यापेक्षां ठळक व चमत्कृतिजनक उदाहरण दुसरें कोणतें असूं शकेल ! परंतु यापेक्षाही अधिक चमत्कार पुढेंच आहे ! केशव भोसले हा मुलगा अगदी लहानपणापासून याच स्वदेशहितचिंतक मंडळींत राहिलेला व वाढलेला. गायन व अभिनय, यांमध्यें प्रावीण्य व प्रसिद्धि मिळविल्यानंतर आपल्या योग्यतेप्रमाणें आपणाला मिळकत व दर्जा मिळत नाहीं अशी कल्पना होऊन तो १९०७ सालीं मंडळींतून फुटून बाहेर पडला. यावेळीं शाहू छत्रपतींनीं काय केलें असेल ? केशव भोसले हा मराठा, छत्रपतींची व त्याची केवळ जातच नव्हे, तर कुलनाम देखील एक ! स्वदेशहितचिंतक मंडळींचे मालक सर्व ब्राह्मण; आणि याच वेळेस शाहूछत्रपतींचा क्रोध संस्थानांतील ब्राह्मणवर्गावर कडाडत होता. अशा स्थितींत या घडलेल्या प्रकाराला जातीय वादाचें स्वरूप देऊन केशवचा कैपक्ष घेऊन स्वदेशहितचिंतक मंडळीवर आग पाखडणें शाहू छत्रपतींसारख्या संधि-








साधू मुत्सद्याला मुळींच कठिण नव्हतें. ब्राम्हण-वर्गाविरुद्ध चालविलेल्या मोहिमेंत ही एक फार सोइस्कर अशी आघाडी शाहूमहाराजांना उघडता आली असती. परंतु त्यांनीं तसें न करितां स्वदेशहितचिंतक मंडळीची तक्रार ऐकून केशवबर राग केला व त्याला धाक दाखवून कंपनींत पुनः आणण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न अर्थातच सफल झाला नाहीं. या प्रसंगामुळें उत्पन्न झालेल्या वैमनस्याची मानी केशवच्या मनानें इतकी कडकडीत जाणीव ठेवली होती कीं, महाराजांनीं आपण होऊन बोलावणें करीपर्यंत आपली कंपनी ( ललितकला ) घेऊन कोल्हापुरास जायचें नाहीं, असा त्यानें निश्चय केला होता. अखेर १९२० सालीं महाराजांनीं निमंत्रण केलें तेव्हांच केशवराव मानानें व इतमामानें कोल्हापुरास गेले आणि तेथील गौरवाचा अपूर्व सोहळा त्यांनीं उपभोगिला. रंगभूमीच्या वातावरणांत जातीय भेदभावनेचें बीज रुजूं शकत नाहीं, या सिद्धांताचें याच्यापेक्षां अधिक परिणामकारक उदाहरण दुसरें कोणतें असूं शकेल? ब्राह्मणाचे कट्टे दुष्मन् व क्षत्रिय मराठ्यांचे पाठीराखे म्हणून गाजलेले महाराज एका ब्राम्हणी कंपनीचा कैवार घेऊन मराठा तरुणास दवकावतात, ही अलौकिक घटना आमची मराठी रंगभूमीच घडवून आणूं शकली!

हा मुद्दा सिद्ध करण्यासाठीं असले प्रसंग आणखी शोधून काढण्याचा खटाटोप करीत बसण्याची जरूरी नाहीं. रंगभूमीच्या स्थितिगतीचें केवळ वरवर अवलोकन केलें तरी समाजाचे खालपासून वरपर्यंत सर्व थर जातीय भेदभावना व सामाजिक निर्बंध विसरून रंगभूमीच्या महानंदांत कसे एकरूप झाले, हें सहज दिसून येण्याजोगें आहे. केशवराव भोसल्यांचा गौरव व कौतुक करण्यामध्यें अनेक ब्राह्मणमंडळी प्रमुख, तर बालगंधर्वावरून जान कुरबान करून टाकण्यास गुजराथी व भाटे मंडळी तयार! प्रत्यक्ष नाटकें करणाऱ्या मंडळींत तर अनेक जातींची खिचडी झालेली आपणास सर्वत्र दिसेल. किर्लोस्करी वळणाच्या संगीत नाट्यांत पांडोबा गुरवांच्या कंपनीनें खुद्द किर्लोस्कर मंडळीशीं स्पर्धा करण्याइतपत उच्चांक गांठला होता. गोव्यांतील गायक समाज, दक्षिण कोंकणांतील भंडारी समाज, चांदा जिल्ह्यांतील वैश्य समाज—यांचें नाट्यप्रेम केवळ अपूर्व असें आहे. नाटकांच्या नादापायीं गरिबीच्या संसारावर तुळशीपत्र ठेवून रंगदेवतेला सर्वस्व अर्पण केलेले असे कित्येक लोक या समाजांतून आढळतील. या लोकांनीं किती नाट्यसमाज स्थापिले असतील, यात्राउत्सवांच्या निमित्तानें, किंवा कांहीं निमित्त नसतांहि किती नाटकें करून दाखविलीं असतील, याची गणती करतां यावयाची नाहीं. महाराष्ट्राइतका नाटकाच्या नादानें आमूलाग्र नादावलेला दुसरा कोणताही देश किंवा प्रांत दाखवितां येईल कीं नाहीं याची शंकाच आहे. आजकाल रंगभूमिचा ऱ्हास झाला आहे, ती नष्टप्राय झाली आहे, असें आपण शहरी लोक म्हणतों. परंतु खेड्यापाड्यांतून होणाऱ्या नाटकांचा भर मोठ्या प्रमाणांत ओसरला आहे, असें दिसत नाहीं. आमची संस्कृति अस्सल स्वरूपांत खेड्यापाड्यांत जिवंत आहे, असें विधान ज्याप्रमाणें देशभक्तांकडून केलें जातें, त्याप्रमाणें आमची नाट्यकला आज खेड्यापाड्यांत जिवंत आहे, असें रंगदेवतेच्या भक्तानें म्हटलें तर तें सार्थच ठरेल.

## सामाजिक समतास्थापनेची कामगिरी

रंगभूमीचा प्रभाव जातीय भावनेप्रमाणेंच वर्गीय भावनेचें प्राबल्य कमी करण्यासही कारणभूत झालेला आहे. सत्ता व संपत्ति यांच्या योगानें निर्माण होणारी समाजांतील उच्चनीचता जर कोठें विसरली जात असेल, तर ती रंगभूमीच्या प्रांगणांत! संक्रमणावस्थेंत असलेल्या आपल्या समाजांत दोन्ही प्रकारची वर्गीय विषमता अस्तित्वांत आली असून तिचा दुहेरी जाच दलितांना सोसावा लागतो. इंग्रजी अमलाच्या सुरवातीस आपल्या समाजाची घडी सरंजामी पद्धतीवर बसलेली होती. राजेरजवाडे, संस्थानिक, जहागिरदार, इनामदार, जमीनदार, वतनदार अशा वंशपरंपरा सत्ता व मत्ता उपभोगणाऱ्या सरंजामदार वर्गाच्या श्रेष्ठांपासून कनिष्ठांपर्यंतच्या उतरत्या भांजणीच्या श्रेणीनें समाज बद्ध झालेला होता. इंग्रजांच्या भांडवलशाही सत्तेची येथें स्थापना होऊन तिच्या आश्रयाखालीं येथें देशी भांडवलशाही मूळ धरूं लागली. तेव्हां मूळच्या सरंजामशाही रचनेवर भांडवलशाही समाजरचनेचें कलम होऊं लागलें व त्यामुळें खिचरी स्वरूपाची कांहीं मिश्र अशी समाजाची घडण








बनूं लागली. समाजघटनेच्या तात्त्विक विवेचनाच्या खोल पाण्यांत आपल्याला शिरावयाचें नसून मराठी रंगभूमीनें या समाजाच्या अवस्थेंत समस्थितिस्थापक ( equalizing influence ) या नात्यानें बजावलेली कामगिरी तेवढी लक्षांत घ्यावयाची आहे. महाराष्ट्रांतील सरंजामदार वर्ग तर प्रारंभापासून हिरिरीनें रंगभूमीच्या उभारणीला व जोपासनेला सहायभूत होण्यास सज्ज झालेला दिसून येतो. असें मराठी संस्थान क्वचितच आढळेल कीं ज्याच्या एखाद्या तरी अधिपतीनें नाटकी लोकांना जवळ करून एखादी नाटक मंडळी काढण्याचा किंवा एखादीला आश्रय देण्याचा उपक्रम केला नसेल. सांगलीचे चिंतामणराव अप्पासाहेब, जमखिंडीचे सर परशुरामभाऊ, करवीरकर शाहू छत्रपती, इंदूरचे तुकोजीराव आणि ग्वाल्हेरचे माधवराव यांचें नाट्यप्रेम तर रंगभूमीच्या इतिहासांत चिरस्मरणीय झालेलें आहे. आपली पदवी विसरून नाटकी लोकांमध्यें समभावनेनें मिसळणाऱ्या किती तरी संस्थानिकांच्या गोष्टी सांगण्यांत येतात. ग्वाल्हेरचे अलिजाबहादूर माधवराव शिंदे—सर्वांत मोठे महाराष्ट्रीय संस्थानिक—यांची व पाटणकर सं. मं. चे मालक माधवराव पाटणकर यांची दोस्ती सुप्रसिद्ध आहे. मिरजेचे अधिपति कै. बाळासाहेब यांची भाऊराव कोल्हटकर यांच्याशीं अशीच दोस्ती होती. नाटकी लोकांमध्यें मिळूनमिसळून वागण्याच्या शाहूछत्रपतींच्या वृत्तीसंबंधानें तर बोलावयासच नको. संस्थानिकांप्रमाणेंच जहागिरदार व इनामदार वर्गानेंही अनेक नाटककंपन्या काढल्या, चालविल्या व नाटकी मंडळींशीं समभावनेनें दोस्ती केली. याचीं अनेक उदाहरणें पुढें रंगभूमीच्या इतिहासांत आपणांस दिसून येतील.

इंग्रजी अमलामध्यें निर्माण होऊं लागलेला जो देशी भांडवलदार व व्यापारी वर्ग, तो रंगभूमीच्या परिवारांत सामील झाल्याचीं उदाहरणें बरींच कमी सांपडतील. याचें सहज लक्षांत येण्याजोगें कारण हेंच कीं महाराष्ट्रीय समाजामधून भांडवलदार व व्यापारी वर्ग असा उद्भवलाच नाहीं. खुद्द महाराष्ट्रीय समाजाचीं आर्थिक सूत्रें आस्ते आस्ते गुजराथी, भाटिया, मारवाडी, लिंगायत वगैरे समाजांतील व्यक्तींच्या हातीं गेलीं. या समाजांतील व्यक्तींनीं जितक्या प्रमाणांत मराठी भाषा व संस्कृति आपलीशी केली, तितक्या प्रमाणांत रंगभूमीसहि त्यांचा आश्रय मिळाला. परंतु हें प्रमाण मर्यादितच राहिलें. महाराष्ट्रांत शिरलेल्या या समाजांना महाराष्ट्र अद्याप स्वतःमध्यें जिरवूं शकलेला नाहीं. मराठी नाटकांना गुजराथी व मारवाडी शेटजी उपरी प्रेक्षक म्हणून येतात, वेळेनुसार कंपन्यांना पैशाची मदतहि करतात परंतु यापेक्षां अधिक निकटचे संबंध मराठी रंगभूमीशीं त्यांनीं ठेवल्याचीं उदाहरणें फारशीं आढळतील असें वाटत नाहीं.

अस्सल महाराष्ट्रीय वैश्यवर्ग, जो थोडाबहुत पैसेवाला उरला आहे, तो इतर वर्गांप्रमाणेंच रंगभूमीशीं समरस होऊन जातो, याचें उदाहरण म्हणजे विठोबा खंडाप्पा गुळवे यांचें होय. यांच्या स्नेहभावनेनें केलेल्या साहाय्याच्या अभावीं किर्लोस्कर मंडळीची व्यवस्थित संघटना होऊं शकली नसती व टिकली नसती हें लक्षांत घेतलें म्हणजे सावकार किंवा व्यापारी हासुद्धां आमच्या रंगभूमीचा महत्त्वाचा घटक कसा असूं शकतो हें दिसून येतें. मनोहर स्त्रीसंगीत मंडळीचे मालक चिवटे, यांचेंही नांव या बाबतींत उदाहरणादाखल घेतां येईल.

## स्वयंमन्य शिष्टपणाला धक्का

इंग्रजांनीं हिंदुस्थानांत प्रस्थापिलेली जी द्रव्यकेंद्रक साम्राज्यशाही तिच्या छत्राखालीं व तिच्या आश्रयानें परिपुष्ट झालेला जो आंग्लविद्याविभूषितांचा पांढरपेशा वर्ग, तो रंगभूमीच्या परिवारांत किती आत्मीयतेनें व किती मोठ्या प्रमाणांत सामील झाला हें येथें सांगण्याची जरूरच नाहीं. रंगभूमीची जोपासना करण्याचें, कलादृष्ट्या तिची योग्यता वाढविण्याचें, उच्च आदर्श तिजपुढें ठेवून उदात्त व उन्नतिकारक विचारांची वाहक तिला बनविण्याचें श्रेय बहुतांशीं पांढरपेशा समाजाकडेच जातें. खुद्द नाटकाच्या पेशांत शिरलेले बहुतेक तरुण पांढरपेशा समाजांतीलच असतात. हें तर झालेंच; परंतु इतर अनेक नात्यांनीं पांढरपेशा वर्गांतील मनुष्य नाट्यव्यवसाय करणाऱ्या लोकांमध्यें दोस्तीच्या व खेळीमेळीच्या भावनेनें मिसळत असतो. नाटककार म्हणून, कंत्राटदार म्हणून, दिग्दर्शक म्हणून, तालीम मास्तर म्हणून, या वर्गांतले लोकच नाटकी लोकांशीं संपर्क








ठेवीत असतात. ह्याखेरीज हौसेनें व कौतुकानें समाजामध्यें अत्यंत सन्मान्य व थोर गणलेल्या व्यक्ती नाटकमंडळ्यांमध्यें खेळीमेळीनें मिसळतांना पाहिल्या म्हणजे आमची रंगभूमि ही उच्चनीचतेच्या भावना सपाट करून सोडणारी शक्ति ( levelling influence ) कशी आहे हें उत्कृष्ट रीतीनें ध्यानांत येतें. पांढरपेशा वर्गातील उच्चपदस्थ व्यक्तींनीं नाटकमंडळ्यांची साथ केल्याचें दृश्य किर्लोस्कर नाटकमंडळीच्या इतिहासांत दिसून येतें, तें सुप्रसिद्धच आहे. पुण्यांतील वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध केरूनाना छत्र्यांपासून तों तरुण व तडफदार सीतारामपंत चिपळूणकरांपर्यंत सुशिक्षित समाजांतील अनेक वजनदार मंडळी किर्लोस्कर कंपनीच्या भजनीं असत. मुंबईसही ॲडव्होकेट काशीनाथ त्र्यंबक तेलंग, शांताराम नारायण, महादेव चिमणाजी आपटे इत्यादि थोर व विद्वान् लोक किर्लोस्करांचे चाहते होते. किर्लोस्करांच्या नाटकानें पांढरपेशा वर्गाच्या स्वयंमन्य 'संभावितपणा 'वर कसा हल्ला चढविला होता, यांचें तत्कालीन वृत्तपत्रांत, कुत्सित दृष्टीनेंच कां होईना, केलेलें पुढील वर्णन सध्यांच्या वाचकांस उद्बोधक वाटेलः—

" महाराज, आतांशा पुण्यामध्यें अशी काय गंमत उडाली आहे, कीं कोणाला पुरुषार्थ करावयाचा असेल, तर नाटकांत सोंग घ्यावें, लौकिक मिळवावयाचा असल्यास एखाद्या नाटकाच्या जाहिरातीखालीं नांव घालावें, ' संभावित ' हें पद मिळवावयाचें असल्यास नाटक्यांशीं संगत ठेवावी, नाहीं तर निदान नाटक्यांच्या मागून रिकामटेकडें तरी हिंडावें ...... तात्पर्य, तूर्त पुण्यांत संभावित कोण ? नाटकी— थोर कोण ? नाटकी— विद्वान् कोण ? नाटकी ! ...... "

—इंदुप्रकाश १७–१०–१८८१

त्याच वृत्तपत्रानें विद्वान् लोकांना लागलेल्या नाटकाच्या नादाबद्दल केलेलें शोकप्रदर्शन पहाः—

" आपसांत एकत्र होऊन लोकांच्या सुधारणेच्या पुष्कळ गोष्टी करावयाच्या आहेत. त्याप्रमाणेंच आपल्या राज्यकर्त्यांपाशीं पुष्कळ मागण्या मागावयाच्या आहेत; हें बहुतकरून सर्व लोकांस ठाऊक असतां त्यांजकडे ते लक्ष देत नाहींत. एवढेंच केवळ नव्हे, तर भलत्याच हलकट कामांत पुढारीपणा घेण्यास त्यांस भूषण वाटतें हें पाहून पराकाष्ठेचें दुःख होतें. या दिवसांत ... ज्ञानप्रसारक सभा इ० अत्यंत उपयुक्त मंडळ्या, ज्या अगदीं आहेत कीं नाहींत अशा झाल्या आहेत, त्यांचें पुनरुज्जीवन करणें हें स्तुत्य काम एकीकडे ठेवून तीनतीन चारचार पदव्यावाले गृहस्थ नाटकांच्या हँडबिलावर सह्या करितात आणि त्यांतच कृतकृत्यता मानितात, ह्याहून देशाचें दुसरें दुर्दैव तें कोणतें ? "

—इंदुप्रकाश ३१–१०–१८८१

' इंदुप्रकाश 'कर्त्यानें लिहिलेला हा मजकूर कांहींसा मानभावीपणाचा व वैयक्तिक हेव्यादाव्यानें स्फुरलेला होता, हें खरें असलें, तरी पांढरपेशा समाजाच्या स्वयंश्रेष्ठतेच्या व शिष्टपणाच्या भावनांना किर्लोस्करी नाटकांच्या लोकप्रियतेनें कसा धक्का दिलेला होता हें प्रस्तुत उताऱ्यावरून अप्रत्यक्षरीत्या दिसून आल्याखेरीज राहत नाहीं.

परंतु पांढरपेशा वर्गातील प्रमुखांनीं नाटकी लोकांची साथ करण्याची परंपरा किर्लोस्करांपासूनचीच नसून आमच्या रंगभूमीच्या प्रारंभकालापासून सुरू झालेली आहे. विष्णुदास भावे यांची नाटक मंडळी जेव्हां मुंबईस गेली, तेव्हा तिच्या खेळांच्या व्यवस्थेचें कंत्राट मुंबईतील डॉ. भाऊ दाजी यांनीं घेतलें होतें असें, त्यांच्या सहीची पावती विष्णुदासांना उद्देशून दिलेली विष्णुदासांच्या वंशजांच्या संग्रहीं आहे, त्यावरून दिसून येतें. डॉ. भाऊ दाजींसारख्या मुंबईतील सन्मान्य नागरिकानें, श्रेष्ठ विद्वानानें, श्रीमान् व ख्यातिमान् नेत्यानें नाटक मंडळीच्या व्यवस्थेचें कंत्राट घ्यावें ही घटनाच, रंगभूमीचें वातावरण प्रथमपासूनच वर्गीय भावनांचा उच्छेद करणारें कसें होतें, हें दिग्दर्शित करते.

जातिनिष्ठ आणि वर्गनिष्ठ भावनांची जाणीव नष्ट करून टाकून समानतेच्या पातळीवर सर्व समाजास एकत्र आणणारी प्रभावी शक्ति या नात्यानें महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासांत रंगभूमीचें स्थान केवढें महनीय व थोर आहे, हें वरील संक्षिप्त प्रतिपादनावरून लक्षांत येण्यास अडचण पडणार नाहीं. ' नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समारा-








धनम् ' या कालिदासोक्तीमध्यें ' भिन्नरुचेः ' या बरोबर ' भिन्नजातेः ' आणि ' भिन्नवर्गस्य ' अशीं आणखी दोन विशेषणें घातल्यास ही सुभाषितोक्ति महाराष्ट्रीय रंगभूमीस उत्कृष्ट रीतीनें लागू पडेल. अशा या सर्व जातींच्या व सर्व वर्गांच्या लोकांस समानतेच्या पातळीवर एकत्रित करणाऱ्या सर्वांगरमणीय रंजनसाधनाचें सर्व समाजानें अपूर्व असें कोडकौतुक केलें तर त्यांत नवल काय ?

## जिवट चैतन्यशक्ति

आमच्या रंगभूमीचे आणखी एकदोन गुणविशेष लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. या गुणविशेषांमुळें ती अधिकच लोभनीय व सर्वांस हवीशी वाटणारी झाली आहे, असें विचारांतीं दिसून येईल. पहिली गोष्ट ही कीं आमच्या मराठी रंगभूमीनें बदलत्या समाजस्थितीस व परिवर्तन पावणाऱ्या अभिरुचीस अनुसरून अनेक रूपें लीलेनें धारण करण्याचें अपूर्व सामर्थ्य व्यक्त केलें आहे. या बाबतींत व्यक्त झालेला तिचा लवचीकपणा तिच्या जिवट चैतन्यशक्तीचा द्योतक आहे. प्रारंभींच्या अवस्थेंत रंगभूमि ही सरंजामदार संस्थानिक व त्यांचा आश्रित वर्ग यांच्या आधारानें अस्तित्वांत आली. या लोकांची संस्कृति व मनोभूमिका भारत, रामायण, भागवत व इतर पुराणग्रंथ यांच्या रंगानें रंगलेली होती. तस्मात् त्या काळांत व त्या वर्गामध्यें अस्तित्वांत आलेली रंगभूमि निव्वळ पौराणिक कथांच्या स्वरूपाची असणें हें क्रमप्राप्तच होतें. कांहीं काळानंतर शहरांतून इंग्रजी शिकलेला समाज बराच वाढूं लागून समाजांतील त्याचें प्रस्थही वाढत चाललें. या आंग्लशिक्षित पांढरपेशा वर्गास पौराणिक दशावतारी खेळ गांवढळ वाटावयास लागून त्यांचा कंटाळा येऊं लागला. आमच्या रंगभूमीच्या जिवटपणाची व स्थितिस्थापकतेची खूण हीच कीं, ज्या कंपन्या दशावतारी खेळ करीत होत्या त्याच कंपन्यांनीं नवीन विद्वानांकडून इंग्रजी तऱ्हेवरचीं गद्य नाटकें घेऊन तीं उत्तम रीतीनें बसवून, नव्या सुशिक्षित समाजाच्या अभिरुचीस अनुसरून ' बुकिश ' नाटकांचें युग सुरू केलें. पुढें तीही करमणूक अपुरी वाटूं लागली तेव्हां जुन्या मालमसाल्यास नवशिक्षितांची जोड मिळून नवीन काळास साजेसें किर्लोस्करी संगीताचें युग मोठ्या थाटानें व गाजावाजानें अवतरलें. संगीताच्या मोहिनीनें बराच काळ सर्वांस मुग्ध करून सोडलें खरें, परंतु पुढें हळूंहळूं सुशिक्षित समाजाची अभिरुचि सूक्ष्मतर व ध्येयवादिता उच्चतर होऊं लागली व त्याच्या नाट्याभिलाषी दृष्टीचें या संगीतानें नीटसें समाधान होईना. ' ही सर्व गाण्याची मिठी बसेपर्यंत मेजवानी होती खरी, परंतु यांत नाट्याचें दुर्भिक्षच नजरेस येतें ' अशी त्याची भावना होऊं लागली. पुनः एकवार रंगभूमीस कलाटणी मिळून सामाजिक ना. मंडळी व महाराष्ट्र ना. मंडळी यांनीं ध्येयवादी व उच्च आदर्शांची गद्य रंगभूमि अस्तित्वांत आणली. पुढें कालांतरानें गद्य रंगभूमीला आपला संसार रेटेना, तेव्हां संगीत व गद्य या रंगभूमीच्या दोन्ही शाखांचा ' त्वयार्धं मयार्धं ' या तत्त्वावर मिलाफ करण्यांत आला. मध्यंतरीं अद्भुतरम्यतेचा जमाना येऊन गेला. तो जितक्या आत्मीयतेनें रंगभूमीनें वठवून दाखविला, तितक्याच आत्मीयतेनें त्यानंतर आलेली वास्तववादाची लाटही जिरवून टाकण्यास तिनें कमी केलें नाहीं. एका सुप्रसिद्ध कंपनीचेंच एक विशिष्ट उदाहरण घेतल्यास मनास मोठा चमत्कार वाटतो. शहरी सुशिक्षितांच्या गळ्यांतील ताईत बनलेलें हॅमलेट नाटक जिनें हातखंडा वठवून दाखविलें, त्याच शाहूनगरवासी मंडळीनें राणाभीमदेवप्रभृति भडक रंगाचीं दणदणीत नाटकें व ' तुकाराम 'प्रभृति संतपर नाटकें तितक्याच बेमालूम रीतीनें करून दाखवून अशिक्षित बहुजनसमाजाचें तत्परतेनें आराधन केलें. तात्पर्य, गेल्या १०० वर्षांच्या काळांतले रंगभूमीचे बदलते आविर्भाव एकामागून एक मनश्चक्षूंसमोर आणले म्हणजे मन सकौतुक आश्चर्यानें भरून गेल्याखेरीज राहत नाहीं.

## पडद्याआड चाललेलें नाटक !

आमच्या रंगभूमीच्या कारभारांत व खेलखसाल्यांत मानवी स्वभावाच्या वैचित्र्यानें रंगीबेरंगी प्रदर्शन दृष्टीस पडतें. महाराष्ट्रीयांच्या स्वभावाचें, मनोरचनेचें व गुणदोषांचें–विशेषेंकरून दोषांचें–प्रतिबिंब रंगभूमीच्या या प्रांगणांत पडलेलें अनुभवास येत असल्यामुळें बाहेरील सामान्य मनुष्याचें मन एक प्रकारच्या अनिर्वचनीय आकर्षणानें रंगभूमीच्या

पडद्याआंतील दृश्यांकडे ओढ घेत असतें. मानवी मनाची अशी एक चमत्कारिक प्रवृत्ति आहे कीं गुणी मनुष्याच्या अंगच्या दोषांचें व क्षुद्र लकबांचें एक प्रकारचें जबरदस्त आकर्षण त्याला वाटत असतें. टिळकांच्या स्वराज्याच्या चळवळीच्या हकीकतीमध्यें जितकी गोडी वाटणार नाहीं, इतकी गोडी टिळकांना सुपारीचें व्यसन होतें हें ऐकण्यांत त्याला वाटेल. नाट्यव्यवसायांत शिरलेल्या माणसांच्या अंगीं तर काय, गुण एखादाच असायचा–दोषांची कंठाळ मात्र बहुधा चांगलीच भरलेली असायची. अर्थात् सामान्य मनुष्यास रंगभूमीच्या त्या मयासुरी सृष्टीचें जें एक विलक्षण प्रकारचें आकर्षण वाटतें, तें वर उल्लेखिलेल्या सर्वजनसामान्य अशा विकृत प्रवृत्तीमुळें होय. नाटकी लोकांचीं तीं व्यसनें–त्या व्यसनावर आधारलेल्या प्रख्यात नटांसंबंधाच्या अद्भुतरम्य कथा, यांनीं कितीजणांचें चित्तरंजन आजपर्यंत केलें असेल ! नाटकी लोकांमधील परस्पर हेवेदावे, त्यांची फुटीरपणाची वृत्ति, त्यांचा बेछूटपणा व धर्मभोळेपणा, त्यांच्या मनाची क्षुद्रता व त्यांचें औदार्य, त्यांचा द्रव्यलोभ व अदूरदर्शी अव्यावहारिकपणा, त्यांचा अविचारी भिश्रेपणा व मूर्ख साहसीपणा–या सर्वांचीं दृश्यें डोळ्यांपुढून सरकूं लागलीं म्हणजे असें वाटतें कीं स्टेजवर जें नाटक दाखविलें जातें त्यापेक्षां पडद्याच्या आंत चाललेलें हें अखंड नाटक कितीतरी अधिक मनोहर आहे ! वास्तववाद येथें मूर्तिमंत अवतरला आहे ! भूमिकांचा परस्परमेळ, त्यांच्यामधील संघर्ष व त्याचा निकराचा बिंदु नटनाटकसूत्रधारानें येथें किती बेमालूम रीतीनें साधला आहे !

[ महाराष्ट्र रंगभूमि शतसांवत्सरिक उत्सवमंडळातर्फे रंगभूमीचा सांगोपांग इतिहास लिहिला जात आहे. त्यासाठीं लिहिलेल्या प्रारंभींच्या प्रकरणांतील प्रस्तुत लेख हा एक अंश आहे ].

## आत्मनिरीक्षण व मानसशास्त्राचा अभ्यास

पान १३ वरून ]

जीवनांत आणि विशेषतः राजकीय जविनांत ही प्रक्षेपणक्रिया अतिरेकानें पहावयास सांपडते. दुसरी एक कमी दर्जाची क्रिया म्हणजे दुसऱ्यास दोष न देतां आत्मसमर्थन करण्याची क्रिया होय. ही आत्मसमर्थनाची क्रिया खोटी असली तरी ती एक युक्तिवादाची क्रिया असते. खऱ्या कारणाशीं संबंध नाहीं असा युक्तिवाद स्वतःला पटवून देण्याचा तो एक प्रयत्न असतो. हा प्रयत्न अनेक वेळा आत्मवंचनेचा असला त ी केव्हां केव्हां अत्यंत प्रामाणिकहि असतो. ह्यां प्रयत्नास आत्मसंरक्षक प्रतिक्रिया म्हणतात. प्रक्षेपण आणि आत्मसंरक्षक प्रतिक्रिया ह्या मनानें समतोलाच्या अभावीं अवलंबिलेल्या दुय्यम योजना होत. समतोल साधलेला नाहीं व ह्या दुय्यम योजनाहि यशस्वी होत नाहींत अथवा एखाद्यास त्या सुचत नाहींत अशा ठिकाणीं मानसिक विकृती उद्भवतात. ह्या विकृती लहान, मोठ्या व इतर विविध प्रकारांच्या असतात.

मानवी मनोयंत्राचें हें अल्प वर्णन आहे. मन व शरीर यांचें परस्परावलंबित्व, मनाचें कर्तृत्व, मनामुळें मानवास प्राप्त होणारें व्यक्तित्व, व्यक्तित्व तयार होण्याशीं मूल प्रवृत्तींचा संबंध, तें चांगलें तयार होण्यास तारुण्यांतलि प्रयत्नांची इष्टता, मनोविषयक कांहीं मूलभूत व दुय्यम सिद्धांत ह्या सर्वांचें प्रतिपादन केलें आहे. ह्यापेक्षां अधिक विस्तारानें करण्याची येथें गरजहि नाहीं. तथापि मानवी स्वभावाची यथार्थ कल्पना येण्याच्या हेतूनें व आत्मनिरीक्षण नीट होण्याच्या दृष्टीनें करावयाच्या मानसशास्त्राच्या अभ्यासाची दिशा ध्यानांत येण्यास तें पुरेसें आहे असें वाटतें.

# आपल्या महान् शेजाऱ्याची आधुनिक पार्श्वभूमि

श्री. सतीश कालेलकर एम्. ए. (ऑक्सफर्ड), प्रिन्सिपॉल, कॉमर्स कॉलेज, नागपूर

**ज्या** कालावधीला जागतिक इतिहासांत क्षणमात्र लेखण्यांत येईल अशा केवळ पंचवीस वर्षांच्या अत्यल्प अवधींत, महात्माजींच्या नेतृत्वाखालीं हिंदुस्थाननें एका प्रचंड व बलाढ्य साम्राज्यशाहीला हांकलून लावून स्वातंत्र्यसंपादन केल्यापासून, विस्मययुक्त आदरानें पाहणाऱ्या आशियाखंडांतील सर्व राष्ट्रांनीं अभिषेक किंवा संस्कारावांचून हिंदुस्थानला अत्युच्चपदीं बसवून त्याचें नेतृत्व स्वीकारलें आहे. यंदा दिल्लीला भरलेल्या आशिया-संमेलनांत देखील हिंदुस्थानचा वडिलकीचा मान सर्व राष्ट्रें कशीं सहजीं स्वीकारीत होतीं, हें पाहून पाश्चात्य राष्ट्रांना आशियांतील राजकारणांत आतां महत्त्वाचें केंद्र कोठें आहे, याची पूर्ण जाणीव होऊन चुकली असेल यांत शंका नाहीं.

## हिंदुस्थानच आशियाचा भावी नेता

एक काळ असा होता कीं, आशियाखंडांत नेतृत्वाची माळ कोणाच्या गळ्यांत पडेल हें सांगणें कठीण होतें. आधुनिक शस्त्रास्त्रांनीं सज्ज असा जपानच आशियाचा नेता होऊं शकतो अशी कल्पना कांहींची होती. इंग्रज हिंदुस्थानांतून जातील ही शक्यताच मुळीं ज्यांना पटत नव्हती व जपानचें पारिपत्य केव्हां ना केव्हां रशिया किंवा अमेरिका करील याची ज्यांना खात्री होती, असे राजकारणी लोक चीनकडे नेतृत्व येईल असें समजत. पण या बाबतींत दूरदृष्टिपूर्वक विचार करून अनुमान बांधणाऱ्या प्रख्यात अमेरिकन पत्रपंडित कार्ल फुन वाइगंडचे दहा वर्षांपूर्वींचे उद्गारच शेवटीं खरे ठरणार आहेत असा रंग आज दिसत आहे. "जपान किंवा चीन नव्हे, तर हिंदुस्थानच भावी आशियाचा नेता होणार आहे. जपानी मनोवृत्ति चपळ पण उथळ आहे. चीनची मनोवृत्ति गंभीर पण धीमी आहे; हिंदुस्थानची मनोवृत्ति मात्र जशी गंभीर तशी चपळ आहे. त्याखेरीज, चीनचा झुकाव आधिभौतिक गोष्टींकडे आहे तर हिंदुस्थानची आध्यात्मिकता हा त्याचा एक मोठा गुण आहे." हे त्याचे उद्गार होते.

आध्यात्मिकतेचें बाळकडू मिळालेल्या हिंदुस्थानला या चर्चेशीं खरोखरी कांहींच कर्तव्य नाहीं. हजारों वर्षांचा जो अमूल्य वारसा हिंदुस्थानला मिळाला आहे, त्याची लयलूट इतर राष्ट्रांकडून करविण्यांतच हिंदुस्थानला संतोष आहे. आंतरराष्ट्रीय राजकारणांत आशियाचें नेतृत्व हिंदुस्थानकडे चालून आलें तर ती जबाबदारी हिंदुस्थान टाळणार नाहीं. पण त्या नेतृत्वाकरितां काळींवेळीं कृत्यें करण्यास किंवा लावालावी करण्यास हिंदुस्थान कधींच तयार होणार नाहीं.

या ना त्या कारणामुळें हिंदुस्थानच्या गळ्यांत आज आशियाच्या नेतृत्वाची माळ पडली आहे. अशा वेळीं, ज्यांचें नेतृत्व करावयाचें त्यांची पूर्वपीठिका काय आहे, त्यांचा आधुनिक इतिहास काय सांगतो, त्यांचें भविष्य काय दिसत आहे, इत्यादि गोष्टींचा विचार करणें आवश्यक होऊन बसतें. त्यांत पुन्हा चीनसारख्या अत्यंत प्राचीन, अत्यंत सुसंस्कृत व अत्यंत विशाल अशा राष्ट्राचें, निदान तें आपला शेजारी आहे म्हणून तरी, आकलन करणें, हें आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे.








खडबडून जागृत होऊन जपानसारख्या बलाढ्य राष्ट्राला पांचसात वर्षें एकट्यानें टक्कर देणाऱ्या चीनच्या महत्तेचें आकलन त्याच्या चित्रविचित्र इतिहासाच्या अभ्यासानेंच होऊं शकेल.

## चीनच्या चांदीच्या भुकेवर अफूची मात्रा !

१९ व्या शतकाच्या मध्यांत पाश्चात्य भांडवलशाही राष्ट्रें जेव्हां स्वतःच्या मालाकरितां गिऱ्हाइकें शोधण्यासाठीं चारी बाजूस नजर वळवूं लागलीं तेव्हां साहजिकच चीनवर त्यांची दृष्टि खिळली. पण स्वतःच्या चहा व रेशीम या दोन निर्यातीच्या पदार्थांबद्दल सोनेंचांदीखेरीज इतर कांहीं न स्वीकारणाऱ्या चीनची चांदीची भूक शमविणें हें सोपें काम नव्हतें. तेव्हां चीनवर राजकीय आधिपत्य मिळविल्याखेरीज त्याच्या गळ्यांत आपला माल अडकविणें जवळ जवळ अशक्य आहे, याची जाणीव पाश्चात्य राष्ट्रांना चांगलीच होऊं लागली होती. पण अशाप्रकारचें आधिपत्य मिळेपर्यंत कांहीतरी तोड काढणें आवश्यक होतें. तेव्हां या परिस्थितींतून उपाय म्हणून इंग्रजांनीं चीनला अफू पाठविण्याचा उपक्रम सुरू करून स्वतःच्या देशांतून चीनकडे वाहणारा चांदीचा ओघ थोपवून धरला. चीनमध्यें राज्य करणाऱ्या त्यावेळच्या मंचू राजवंशाला अर्थातच हें पसंत न पडल्यामुळें चिनी लोक ज्या युद्धाला "अफूची लढाई" म्हणतात ती लढाई आजपासून सुमारें शंभर वर्षांपूर्वी लढली गेली ( १८४०–४२ ). "आम्हीं देऊं तो माल घ्या, नाहीं तर लढाई पुकारतों" असें निर्लज्जपणें सांगणाऱ्या इंग्रजांचा या युद्धांत विजय झाल्यानें या वेळेपासून चीनमध्यें राजकीय शिरकाव झाला. पण चीनमध्यें शिरकाव करणें ही एक गोष्ट, तर चीनवर आधिपत्य मिळविणें ही निराळीच गोष्ट होती. त्यांत पुन्हां देशांतील राजवट, जमीनदार व इंग्रज व्यापारी एक होऊन प्रजेला पिळून काढण्याच्या खटपटींत आहेत असें दिसतांच शेतकऱ्यांत धुमसत राहिलेल्या असंतोषाच्या अग्नीनें, अफूचें युद्ध होऊन सात वर्षें होतात न होतात तोंच, पेट घेतला. प्रत्येक 'लोकयुद्धाला' 'बंड' नांव देण्याची संवय असलेल्या इंग्रज इतिहासकारांनीं या स्वातंत्र्ययुद्धाला 'टायपिंगचें बंड' असें नांव दिलें आहे. हें बंड म्हणजे एक अठरा धान्याचं कडबोळें होतें. तसें पाहिलें तर बंड दारिद्र्यानें गांजलेल्या किसानांचें, पण त्याचा रोख होता सर्व परदेशी लोकांवर आणि त्याचें नेतृत्व होतें एका धार्मिक पंथाकडे ! त्यांत पुन्हां या धार्मिक पंथाचा नेता बौद्ध तर नव्हताच, पण तो स्वतःला येशू ख्रिस्ताचा भाऊ समजत असे !

## पाश्चात्य राष्ट्रें व जपान यांचेकडून आक्रमण

या बंडाची परिणति पुढें पॅरिस कॉम्यूनसारखें एक 'टायपिंग सरकार' स्थापन होण्यांत झाली, व या सरकारनें एक वटहुकूम काढून सर्व जमीन स्वतःची हक्काची जमीन नसलेल्या शेतकऱ्यांत वाटून दिली ! देशद्रोह करून परदेशी व्यापारी व राजवटीशीं हस्तांदोलन करणाऱ्या स्वतःच्या राजवंशाला व जमीनदारांना क्रांतिकारी शेतकऱ्यांचें हें रोखठोक उत्तर होतें. पंधरा वर्षेंपर्यंत हा लढा चालला होता. पण शेवटीं या बंडाचा बीमोड करण्यांत आला, व पुन्हा एकदां इंग्रजांच्या ताटाखालचें मांजर होऊन राहण्यास तयार झालेल्या मंचू वंशाचें राज्य स्थापन झालें. पण चीनला आर्थिक व राजकीय दृष्ट्या पादाक्रांत करण्याचा कार्यक्रम व्हावा तितक्या झपाट्यानें सिद्ध होत नाहीं असें दिसतांच इंग्रजांच्या चिथावणीनें सर्व पाश्चात्य राष्ट्रांनीं एकत्र होऊन खुद्द मंचू राजवंशाविरुद्धच लढाई जाहीर केली. ही लढाई १८५६ ते ६० पर्यंत चालून शेवटीं पराभूत चीनला हाँगकाँग बंदर युरोपीय राष्ट्रांना देणें भाग पडलें. व त्या खेरीज इतर अनेक तहाच्या अन्याय्य अटींप्रमाणें किती तरी बंदरांना "तहान्वयेंचीं बंदरें" ( Treaty Ports ) म्हणून परदेशी सैन्याच्या हवालीं करावीं लागलीं. झारशाही रशियानें देखील ही संधि साधून उत्तरेकडील मंगोलिया व मँचुरिया या प्रांतांत आक्रमण सुरूं केलें. जपाननेंही वाहत्या गंगेंत हात धुऊन फोर्मोसा बेट व कोरिया हे भाग काबीज केले व वर युद्धाचा दंड म्हणून जबर खंडणी वसूल केली ती वेगळीच. या खंडणीच्याच मदतीनें जपाननें स्वतःचे उद्योगधंदे पुढें भरभराटीस आणले.








## नवीन विचित्र संघर्ष

या नंतर चीन म्हणजे 'आव जाव घर तुम्हारा' असें एक हतबल व हताश राष्ट्र बनलें. परदेशी भांडवलाचा पूर चीनकडे वाहूं लागला. हळूहळू चीन म्हणजे जगांतील नव्या व जुन्या सर्व भांडवलशाही राष्ट्रांच्या मगरमिठींत सांपडलेली एक वसाहत बनून गेली. परदेशी भांडवलशाहीच्या मदतीनें पुढें देशी भांडवलशाही उत्पन्न होऊन तीहि फोफावून वाढूं लागली. आतां उद्योगधंद्यांना भरती आल्यामुळें व लोहमार्ग व आगगाड्या यांच्या झपाट्यानें होणाऱ्या प्रसारामुळें चीनमध्यें एक नवीनच मजूरवर्ग निर्माण झाला. हा वर्ग जमीनदारांचा शत्रु असून, आधींच जमीनदारांविरुद्ध बनलेल्या वातावरणांत त्यांची आणखी एक भर पडली.

यापुढें जो संघर्ष निर्माण झाला तो मात्र मोठा विचित्र होता. शेतकरी गांजलेले होते जमिनदारांच्या त्रासानें; मजूर त्रासले होते पुंजीपतींच्या पिळवणुकीनें; भांडवलवाल्यांचा राग होता त्यांना पुरता वाव न देणाऱ्या मंचूराजवंशावर; आणि मंचू राजवंशाला पाहिजे होतें 'सार्वभौमत्व'; अशा परिस्थितींत नवीन उत्पन्न झालेल्या व्यापारी वर्गाला जनतेंत 'राजशासन-सुधारणा' (Monarchical reform movement) चळवळ सुरू होत आहे असें दिसतांच त्यानें त्या चळवळीला मंचू-विरोधी चळवळीचें रूप दिलें. अनेक गुप्त सभा व संघ स्थापन होऊं लागले व क्रांतिकारी वातावरणाला रंग चढूं लागला. पण धूर्त मंचू राजवंशीयांनीं ही मंचूविरोधी चळवळ अगदीं मध्यान्हीं यावयाच्या सुमारासच, म्हणजे १९०० सालाच्या सुमारास, मोठ्या कुशलतेनें 'युरोपियन-विरोधी' चळवळींत रूपांतरित करून टाकली व याच प्रकरणीं चिडून जिकिरीस आलेल्या स्वतःच्या असंतुष्ट प्रजेपासून स्वतःचा बचाव करण्याकरितां म्हणून मंचूंनीं इतिहासप्रसिद्ध 'बॉक्सर्स्चें बंड' घडवून आणलें. मंचूराजवंशाला यापासून फायदा मात्र झाला नाहीं. कारण हें बंड परदेशी लोकांनीं मोडलेंच, पण त्याखेरीज मंचूविरुद्ध जनमत जास्त प्रतिकूल बनलें.

## डॉ. सन्--यत्--सेनचें नेतृत्व

एका बाजूनें अनियंत्रित राजसत्ता लोकांना नको होती. दुसऱ्या बाजूनें परदेशी राजवटीचे राजकीय व आर्थिक परिणाम काय होतात व त्यांचीं फळें कशी भोगावी लागतात, हेंहि लोकांना कळून चुकलें होतें. पेंच मोठा विचित्र होता. दारिद्र्यानें गांजलेल्या चिनी जनतेची क्रांतीकरितां तयारी होती. पण ती क्रान्ति कशी करावी याचेंच तिला ज्ञान नव्हतें. थोडक्यांत म्हणजे यावेळीं चीनला क्रांतीचा मार्ग दाखविणाऱ्या नेत्यांची जरूर होती. आणि सुदैवानें असा नेता चीनला लवकरच लाभला. तो म्हणजे डॉ. सन्-यत्-सेन. कॉम्युनिस्टांच्या व्याख्येंत बसूं शकेल अशाप्रकारचा क्रांतिकारक त्याला म्हणता येणार नाहीं. उलट तो एक मध्यमवर्गीय उदारमतवादी सुधारक होता. पण चीनचे खरे मित्र कोण व शत्रु कोण याचें दूरदृष्टीनें आकलन करण्याची शक्ति मात्र त्याच्यांत होती. १९०५ च्या रशियन राजक्रांतीनें त्याच्यावर फार गंभीर छाप पाडली होती. जनसमुदायाला तयार करणें व त्यांच्याकडून बंडाचें निशाण उभारावयास लावणें या गोष्टींचें महत्त्व त्याला पूर्णपणें पटलें होतें. तावडतोब त्यानें 'कुओ-मिन-टांग' या गुप्तसभेचें एका प्रकट पक्षांत रूपांतर करून टाकलें. व १९११ मध्यें प्रथम मंचूच्या अनियंत्रित सत्तेविरुद्ध बंडाचें निशाण उभारून, मंचूना पदच्युत करून, लोकशाहीची स्थापना केली. डॉ. सन्-यत्-सेन या नवीन राजवटीचा प्रमुख बनला. पण लवकरच आपसांतील वैमनस्याला कंटाळून त्यानें आपल्या प्रमुखत्वाचा राजीनामा दिला. उत्तर व दक्षिण चीनमध्यें यानंतर दोन वेगवेगळ्या राज्यव्यवस्था चालूं लागल्या. केवळ बाहुलें बनून राज्य चालविणाऱ्या प्रमुखाच्या हाताखालच्या उत्तरेकडील राज्याला सर्व युरोपीय सत्तांनीं मान्यता दिली. जहाल नेत्यांच्या मार्गदर्शनानें चाललेल्या दक्षिणेकडील राज्याला मान्यता देण्याचें मोठ्यामोठ्या राष्ट्रांनीं नाकारलें.

### जपानचा डाव

१९१४ च्या महायुद्धांत चीन दोस्तराष्ट्रांच्या बाजूनें लढलें. त्याबद्दल कोणत्याही प्रकारचा लाभ








चीनला मिळणें तर बाजूलाच राहिलें, पण जर्मनांच्या पूर्वेकडील सर्व वसाहती गिळंकृत करून बसलेल्या जपाननें उलट चीनकडे २१ मागण्यांचा एक प्रसिद्ध खलिता पाठवून चीनला जवळजवळ स्वतःची वसाहत बनविण्याचा घाट घातला ! उत्तरेकडील स्वार्थी प्रमुखानें मात्र "मला जर चीनचा सम्राट् मानण्यास तयार असाल व माझा राजवंश स्थापूं द्याल तर तुमच्या एकवीसच्या एकवीस मागण्या मान्य करतों" असें उत्तर जपानला पाठविलें. चीनच्या सुदैवानें पाश्चात्य राष्ट्रांना हें सर्व पाहून भीति पडली कीं, जपानच्या या मागण्यांमुळें जपान फार प्रबल होईल. तेव्हां त्यांनीच चीनचा पक्ष घेऊन व नेटानें लढून जपानची डाळ शिजूं दिली नाहीं.

## समाजवादी एकजूट

१९१७ च्या रशियन क्रांतीनंतर रशियाच्या साम्राज्यशाहीविरोधी धोरणामुळें समाजवादाचा प्रसार चीनमध्यें फार झपाट्यानें होऊं लागला. कारण डॉ. सन्-यत्-सेनची खात्री झाली होती कीं, चीनचा खरा मित्र फक्त रशिया आहे. त्यांत पुन्हा व्हर्सायच्या तहांत इतर सर्व राष्ट्रांनीं चीनच्या तोंडाला जीं पानें पुसलीं त्यामुळें तर डॉ. सन्-यत्-सेनची रशियाबद्दलची सद्भावना अधिकच बळावली.

पहिल्या जागतिक युद्धानंतर चीन म्हणजे सर्व राष्ट्रांना मोकाट सुटून खाण्याचें एक कुरणच बनलें. जमीनदारी तर अजून संपूर्णतया नष्ट झालीच नव्हती. त्यांत पुन्हा बुभुक्षित स्वकीय व परकीय भांडवलवाल्यांची भर पडली. सर्वांनीं मिळून जळवांप्रमाणें चीनला शोषण्यास प्रारंभ केला. आणि या सर्व रक्तशोषणामुळें क्रांतिकारी पक्षांना योग्य अशी भूमिका चीनमध्यें सहजीं पैदा झाली. या पक्षांच्या सभासदांची संख्या खूप झपाट्यानें वाढूं लागली व चीन हळूहळू जागा होऊं लागला. यांतूनच १९२१ सालीं चीनच्या कॉम्युनिस्ट पार्टीचा जन्म झाला. सुरवातीस या पक्षाचे अगदींच थोडे सभासद होते. पण परिस्थिति अशी कांहीं होत गेली कीं, साधारणपणें मवाळ असलेली चिनी जनता हळूहळू क्रांतिकारी बनूं लागली. त्यामुळें १९२५ पर्यंत कॉम्युनिस्ट पार्टीची सभासदसंख्या व लोकमतावरील पकड चांगलीच वाढली. पण या सुमारास तिसऱ्या कॉम्युनिस्ट इन्टरनॅशनलनें चीनच्या कॉम्युनिस्ट पार्टीला कुओ-मिन्-टांगबरोबर एक होऊन काम करण्याचा आदेश दिला. चीनच्या कॉम्युनिस्टांनीं बरीच कुरकुर करीत शेवटीं हा हुकूम मान्य केला. या समाजवादी एकजुटीचा एक मोठा फायदा असा झाला कीं, सामान्य जनतेंत खूप मोठी जागृति होऊन तिच्यांतील चळवळ बघतां बघतां फोफावली व भांडवलशाहीला एक जोराचा हादरा बसला. १९२५ ते १९२७ चा काळ चीनच्या आधुनिक इतिहासांत फार चळवळीचा समजला जातो. या काळांत सबंध चीनमध्यें क्रांति दावानलासारखी पसरली होती. उत्तरेकडील कुटिल राजवटीचें उच्चाटन याच कालांत झालें. व शेवटीं एकदां सबंध चीन चीनच्या लोकांनीं चीनच्या लोकांकरितां म्हणून पादाक्रांत केला. क्रांति सफल झाली.

## भांडवलशाहीनें माजविलेली दुही

पण आंतरराष्ट्रीय भांडवलशाहीला मिळालेली ही खरमरीत थप्पड त्या भांडवलाच्यामागें उभे राहिलेल्या पाश्चात्य राष्ट्रांना कशी सहन होणार ! तेव्हां संयुक्त चीनचा पाडाव करण्याचा एकमात्र अचूक उपाय म्हणून त्यांनीं चीनमध्यें भाऊबंदकी उत्पन्न करण्याचा डाव केला. त्यांना माहीत होतें कीं कुओ-मिन्-टांगमधील भांडवलवाले हे सुधारक होते पण क्रांतिकारी नव्हते. त्यांना हेंही माहीत होतें कीं या भांडवलवाल्यांचें व क्रांतिकारकांचें सूत नटिसें नाहीं. कुओ-मिन्-टांगचे सुधारणावादी नेते स्वतःच्या अनुयायांनाच अधिक घाबरतात हेंही परकीय राष्ट्रें जाणून होतीं. त्यांनीं या सर्व ज्ञानाचा उपयोग करून आधीं चँग-कै-शेकला कुओ-मिन्-टांगमधून बाहेर पडण्यास प्रवृत्त केलें आणि हातीं तोंडीं आलेली क्रांति फुकटाफुकटी घालवून दुर्दैवी चीन यादवी करण्यास व त्यांतच सर्व लक्ष घालण्यास प्रवृत्त झाला.

## जपानचें आक्रमण

भाऊबंदकींत गुंतलेला व निर्बल बनलेला चीन साहजिकच टपून बसलेल्या चोरांची शिकार बनला.








१९३२ मध्यें लीग ऑफ नेशन्स व आंतरराष्ट्रिय कायदे या सर्वांना धाब्यावर बसवून साम्राज्यतृष्णेनें प्रेरित झालेल्या जपाननें मांचुकुओवर स्वारी करून तेथें एक 'बाहुलें राज्य' स्थापन केलें. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे अशी कीं, लीग ऑफ नेशन्समध्यें नैतिक तत्त्वाच्या वायफळ बडबडी करणाऱ्या सर्व राष्ट्रांनीं या गोष्टींकडे कानाडोळा तर केलाच पण वर चीनपासून मिळवावयाच्या आर्थिक लाभांत आपलाही भाग असावा यावद्दल कारवाया सुरू केल्या. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, हॉलंड, पोर्तुगल—झाडून सर्व राष्ट्रें, जपान जर लुटींत भाग घेऊं देत आहे तर उगाचि खुसपट कां काढा, म्हणून जपानच्या उघड आक्रमणाकडे कानाडोळा करीत होतीं. पण सुरवातीच्या यशामुळें व भीड चेपल्यामुळें जपान जास्त जास्त धीट व बेमुर्वतखोर बनूं लागलें. हळूं हळूं सबंध चीनच गिळंकृत कां करूं नये व इतर राष्ट्रांना काय म्हणून चरूं द्यावें असा विचार जपानी मुत्सद्यांच्या मनांत घेऊं लागला. त्यांत पुन्हां १९३५ च्या ॲबिसिनियन युद्धापासून युरोपचें लक्ष तेथील नवनवीन उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांकडे गुंतल्यामुळें तर जपानचें चांगलेंच फावलें. आत्मविश्वासानें जपाननें आशियाखंडाला युरोपखंडाच्या दुष्ट कारवायांपासून वांचविण्याचें आपलें ध्येय प्रकट केलें. चीनवरील आक्रमणाला त्यांनीं "चीनचा कॉम्युनिझमपासून बचाव" असें स्वरूप दिलें. आक्रमण करून पादाक्रांत केलेल्या भागाला "आक्रमित भाग" म्हणून मान्यता मिळेल कीं नाहीं याची काळजी जपानला फार वेळ करावी लागली नाहीं. कारण ॲबिसिनिया, स्पेन, ऑस्ट्रिया, झेकोस्लोवाकिया इत्यादि ठिकाणीं पुढें जें होत गेलें त्यांत 'पादाक्रांत भाग म्हणजे पादाक्रान्त भाग, त्यावर अधिकार आक्रामकाचा' हेंच तत्त्व मान्य होत गेलें.

## चीनमधील एकी व अभूतपूर्व संग्राम

चीननें मात्र या आक्रमणापासून एक धडा मिळविला व तो म्हणजे एकीचा. जपानच्या दुष्ट व साम्राज्यशाही आक्रमणाला तोंड देण्यास म्हणून पुन्हां एकदां सुधारणावादी कुओ-मिन्-टांगचे लोक व कॉम्युनिस्ट एक झाले आणि जगानें पूर्वी कधीं न पाहिलेला असा एक अपूर्व संग्राम चालू झाला.

मध्येंच दुसरें महायुद्ध उपस्थित झालें नसतें तर या चीन-जपानच्या युद्धाचा काय निर्णय लागला असता हें सांगणें कठीण आहे. पण ज्या दुसऱ्या महायुद्धाला खरें तोंड फुटूं देण्यास जपानचें मांच्युरियावरील १९३२ चें आक्रमण कारणीभूत झालें व ज्या महायुद्धामुळें चीनमध्यें अपूर्व अशी एकी घडून आली, तें महायुद्ध संपतांच पुन्हां भाऊबंदकी सुरूं होऊन यादवी माजावी व तिला दुसऱ्या एका साम्राज्यतृष्णा जागृत झालेल्या राष्ट्राकडून दुजोरा मिळावा, ही गोष्ट चीनलाच काय पण सबंध आशिया खंडाला धोक्याची आहे यांत शंका नाहीं.

१९२५ आणि १९३५ मध्यें होऊं शकलेली चीनमधील एकी १९४५ पर्यंत नष्ट होऊन देशांत पुन्हां यादवी कां व कशी सुरूं झाली याचा इतिहास पुन्हां वेगळाच आहे. त्या अद्भुत इतिहासाकडे पुढें केव्हांतरी वळूं.










अनुक्रमणिका

# कलावंताचें स्वातंत्र्य

दि. के. बेडेकर

( प्रत्येक कलाकृतींत कलावंताच्या व्यक्तित्वाचा मुक्त आविष्कार झालेला असतो. हें व्यक्तित्व सामाजिक संस्कारांनीं बनलेलें असतें. त्यामुळें कलाकृतींमध्यें समाजाचें प्रत्यक्ष प्रतिबिंब नसतें पण परोक्ष दर्शन असतेंच.

कलाकृति व कलावंताचें व्यक्तित्व हे सामाजिक टीकेचे व मार्गदर्शनाचे योग्य विषय आहेत. व्यक्तित्वाचा मुक्त आविष्कार म्हणजेच कलानिर्मितीचें स्वातंत्र्य व हें स्वातंत्र्य सामाजिक टीकेमुळें व मार्गदर्शनामुळें नाहिसें होत नाहीं.

सोव्हिएत समाजांत कलानिर्मितीवरील सामाजिक टीका संघटित व जागरूक पद्धतीनें होते, परंतु त्यामुळें या क्षेत्रांत हडेलहप्पी व हुकूमशाही निर्माण झालेली नाहीं. तेथें कलानिर्मितीचें स्वातंत्र्य अबाधित आहे. झोशेंको या कलावंताच्या उदाहरणानें ही गोष्ट स्पष्ट होते. खालील विवेचनांत लेखकानें हे मुद्दे विशद केले आहेत. )

परवां 'विश्वभारती 'च्या फेब्रुवारी – एप्रिल ( १९४७ )च्या अंकांत मि. होल्डन यांचा शाकुंतलावर एक लेख वाचला. तेव्हां मनांत असा विचार आला कीं गेलीं पन्नाससाठ वर्षें शाकुंतलाचें रसग्रहण, परीक्षण व विश्लेषण सारखें चाललें आहे. गएटेसारखे युरोपीय तत्त्वज्ञ व रसज्ञ या कलाकृतीचें सौंदर्यमर्म सांगतात. टागोर स्वतःची वेगळीच उपपत्ति देतात. आपल्याकडे प्रा. वै. का. राजवाडे व डॉ. बेलवलकर यांचीं भिन्न मतें व वाद झालेच आणि अगदीं अलीकडे फ्राइडच्या आधारानें दुष्यंताच्या विस्मृतीचा अर्थ लावण्याचे प्रयत्न पाहण्यांत येत आहेत. या सर्वांना विचार करायला लावणारें पण प्रत्येकाला वेगळें व नवेंच भासणारें असें या काव्याचें सौंदर्य व रहस्य आहे. याचा अर्थ काय ?

कलानिर्मितिसंबंधानें सर्वसाधारण व व्यापक अशीं कांहीं अनुमानें यावरून निघूं शकतात काय ?

## समाजाचें परोक्ष दर्शन

प्रथम एक सोपा प्रश्न निकालांत काढूं. शाकुंतल हें कालिदासाच्या भोंवतालच्या कांहीं व्यक्तींचें किंवा समाजाचें प्रत्यक्ष व हुबेहुब, कॅमेरानें काढलेल्या छायाचित्रासारखें, प्रतिबिंब आहे काय ? अर्थातच नाहीं. तसें असतें तर त्यांत सौंदर्यहि आलें नसतें व रहस्यहि उरलें नसतें.

साधा प्रतिबिंबवाद अशा तऱ्हेनें बाजूला सारला तरी वेगळ्या स्वरूपांत तो कधींकधीं अवतरतो. कारण शाकुंतल हें प्रत्यक्ष प्रतिबिंब नाहीं असें म्हटलें तरी दुष्यंत, शकुंतला व कण्वमुनि हीं 'जिवंत' माणसें वाटतातच. ह्या 'जिवंतपणामुळें'च कालिदासाच्या काव्यसृष्टींतील माणसें म्हणजे नुसतीं व्यक्तींचीं वर्णनें आहेत, जास्त कांहीं नाहीं, असा समज होऊं शकतो. उदाहरणार्थ, प्रा. जोग म्हणतात[१] कीं शाकुंतलावरून " कोणताहि सामान्य सिद्धान्त काढतां येणार नाहीं. हें चित्र समाजाचें नसून व्यक्तींचें आहे. "

प्रा. जोग यांचें वरील मत मला अगदीं चूक वाटतें. वरवर पाहतां दुष्यंत शकुंतला इत्यादि पात्रें हीं व्यक्तींचीं चित्रें आहेत, पण खरें पाहतां तीं व्यक्ति-

१ वाफेकर-'स्मृति (नोव्हेंबर १९४६), 'साहित्याचा विषय समाज कीं व्यक्ति,' पान ८८.








चित्रें नाहींत. तीं ज्या व्यक्तींचीं चित्रें आहेत त्या प्रातिनिधिक असल्यामुळें कालिदासानें समाजाचें चित्रहि काढल्यासारखें झालें आहे, असा युक्तिवाद करून प्रा. जोगांचें मत खोडून काढण्याची माझी इच्छा नाहीं. हा युक्तिवादहि मला चुकीचा वाटतो व माझें म्हणणें मी पुढें मांडीन. तूर्त मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं शाकुंतलासारखी कलाकृति व्यक्तींचें व समाजाचें प्रत्यक्ष चित्र नसतें; परंतु समाजाचें परोक्ष दर्शन मात्र हमखास असतें. या वस्तुस्थितीमुळेंच गएटे, टागोर प्रभृतींच्या टीका व उपपत्ति संभवतात.

उदाहरणार्थ, टागोर घ्या. त्यांच्या मतानें, वैषयिक प्रणयाच्या आहारीं जाऊन दुःख भोगणाऱ्या व त्या दुःखामुळें आणि अनुतापामुळें विशुद्ध प्रेम करूं लागणाऱ्या प्रेमिकांचें चित्र कालिदासानें रेखाटलें आहे. शेक्सपिअरच्या नायिकांशीं शकुंतलेची तुलना करून टागोर असा निष्कर्ष काढतात कीं शेक्सपिअरच्या नायिका युरोपीय संस्कृतीच्या मानसकन्या आहेत व विशुद्ध प्रेमाला शेवटीं अंगिकारणारी शकुंतला ही भारतीयांच्या अध्यात्मप्रधान संस्कृतीचें प्रतीक आहे.

टागोरांची ही उपपत्ति प्रा. राजवाडे यांनीं खोडून काढली आहे. त्यांच्या मतानें विशुद्ध प्रेमाची कल्पना उगीच टागोरांनीं लादलेली आहे. वस्तुतः, शाकुंतलांतील सर्व वातावरण भारतीयांच्या स्त्रीविषयक कल्पनांशीं, राजधर्माशीं, दैववादाशीं व इतर श्रद्धांशीं पूर्णपणें सुसंगत आहे. व्यक्तिशः मला टागोरांपेक्षां प्रा. राजवाडे यांचें मत जास्त ग्राह्य वाटतें. पण दोघांच्याहि उपपत्तींच्या बुडाशीं जो सामान्य असा सिद्धान्त गृहीत धरला गेला आहे, तो प्रस्तुत ठिकाणीं मला ठळकपणें नजरेस आणावयाचा आहे. तो सिद्धान्त असा कीं शाकुंतल हें नुसतें व्यक्तींचें चित्रण नसून कालिदासाच्या भावनांचें, विचारांचें व श्रद्धांचें प्रगटीकरण आहे, इतकेंच नव्हे तर तें भारतीय समाजाच्या श्रद्धांचें व आदर्शांचें दर्शनहि आहे.

कालिदासाच्या काळांतील एखाद्या समाज-शास्त्रज्ञानें समकालीनांच्या श्रद्धांचें गद्यवर्णनात्मक चित्र काढलें असतें तर तेंहि समाजदर्शनच झालें असतें पण तें प्रत्यक्ष व प्रतिबिंबात्मक झालें असतें; उलटपक्षीं, शाकुंतल हें परोक्ष समाजदर्शन आहे.

## व्यक्तित्वाचा आविष्कार

दुष्यंत, शकुंतला इत्यादि चित्रें प्रतिबिंबात्मक नाहींत पण प्रातिनिधिक आहेत म्हणून शाकुंतलांतील समाजदर्शन प्रत्यक्ष नसून परोक्ष आहे, असें मात्र मी समजत नाहीं. एखादा समाजशास्त्रज्ञ ज्यावेळीं समाजांतील वेगवेगळ्या गटांच्या व्यक्तींचें वर्णन करतो तेव्हां तो एकाकी स्वयंसिद्ध व्यक्ति न घेतां प्रातिनिधिक व्यक्ति घेतो व तिचें यथातथ्य वर्णन करतो. हें वर्णन जरी कल्पित (प्रातिनिधिक या अर्थी) व्यक्तींचें असलें तरी तें वास्तवदर्शी व प्रत्यक्ष असतें. कलावंतालाहि असंख्य प्रत्यक्ष व्यक्तींमधून निवड करावी लागतेच, पण ती निवड करतांना शास्त्रज्ञाची दृष्टि तो ठेवीत नाहीं. त्यामुळें तशा प्रातिनिधिक व्यक्तींची वर्ण्यविषय म्हणून तो निवड करीत नाहीं. त्याची निवड कोणत्या पद्धतीनें होते ?

स्वतःच्या व्यक्तित्वाच्या आविष्कारासाठीं भोंवतालच्या अचेतन–चेतन सृष्टींतील व समाजांतील कांहीं वस्तू कलावंत निवडतो व त्यांच्या वर्णनांत स्वतःचें व्यक्तित्व शब्दरूपरंगनाद इत्यादि माध्यमांच्या साहाय्यानें प्रगट व मूर्त करतो. माझ्या मतें, कलानिर्मितीच्या प्रक्रियेंत व्यक्तित्वाचें हें प्रमुख स्थान कलास्वरूपशास्त्रांतील आजपर्यंतच्या बहुतेक सिद्धान्तांत मानलें गेलेलें आहे. नवें असें त्यांत कांहीं नाहीं. पण व्यक्तित्वाचें हें महत्व लक्षांत घेऊन कलावंताच्या स्वातंत्र्याचा विचार नीट व स्पष्ट करतां येतो, हें मला मांडावयाचें आहे.

स्वातंत्र्याचा प्रश्न विचारांत घेण्यापूर्वी व्यक्तित्वासंबंधीं थोडें विशदीकरण मी करतों. कलावंताचें व्यक्तित्व म्हणजे नुसती असामान्य संस्कारक्षमता व आविष्कारक्षमता नव्हे. संस्कार (अनुभूति) व आविष्कार यांच्याशिवाय कलानिर्मिति नाहीं. पण तिचें संघटकसूत्र किंवा 'आत्मा' म्हणजे व्यक्तित्व. हें व्यक्तित्व कलावंताच्या एकेकट्या अनुभूतींच्या वरच्या पातळीवर असतें व त्या अनुभूतींना आश्रयस्थान असतें. तसेंच प्रत्येक आविष्काराचें उगमस्थानहि हें व्यक्तित्वच असतें.

हें व्यक्तित्व कलावंतांच्या बाबतींत असामान्य असतें म्हणजे सामान्य गद्य प्रकृतीच्या लोकांपेक्षां वेगळें असतें एवढेंच; परंतु याचा अर्थ तें नैतिक व








इतर दृष्टींनीं हमखास उच्च स्वरूपाचें असतें असें नाहीं. देशकालवर्गादि सामाजिक संस्कारांनींच इतरांप्रमाणेंच कलावंताचें व्यक्तित्वहि बनत जातें व सामाजिक संघर्षामुळें किंवा सुव्यवस्थेमुळें इतरांच्या व्यक्तित्वावर जसे सुपरिणाम किंवा दुष्परिणाम होतात तसेंच कलावंतांच्या व्यक्तित्वावरहि होतात. त्यांच्यांतही उदात्त तशाच दुष्ट व्यक्ति निर्माण होतात.

व्यक्तित्वाचें वरील स्वरूपवर्णन व कलानिर्मिती-मधील त्याचें प्रमुख स्थान ह्या दोन गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे असें दिसून येईल कीं कलानिर्मिती-मध्यें समाजाचें परोक्ष दर्शन घडतें. याचा अर्थ असा कीं कलाकृति म्हणजे वस्तुतः फक्त व्यक्तित्वाचें प्रगटीकरण असतें; पण हें व्यक्तित्व समाजदर्शी अस-ल्यानें या व्यक्तित्वाच्या भिंगांतून ( परोक्षपणें ) टीकाकाराला समाजाचें दर्शन घडूं शकतें.

## कलावंताचें स्वातंत्र्य

शाकुंतलासारख्या कलाकृतींत कालिदासाचें व्यक्तित्व पूर्णपणें आणि सहज व मुक्त तऱ्हेनें प्रगट झालें आहे. या काव्यांतील प्रत्येक प्रसंग व भावना एकेकटी सुंदर नाहीं तर एकंदर काव्याच्या वातावर-णाशीं सुसंगत म्हणून सुंदर आहे व हें वातावरण म्हण-जेच कालिदासाचें मानसविश्व किंवा त्याचें व्यक्तित्व आहे. दुसरीकडे हें मानसविश्व म्हणजेच प्राचीन भारतीयांच्या विशिष्ट समाजव्यवस्थेच्या आश्रयानें उत्पन्न झालेली श्रद्धांची व आदर्शांची सृष्टिहि आहे.

येथें कोणी म्हणेल कीं कालिदासाच्या व्यक्ति-त्वाचा हा आविष्कार " मुक्त " होता असें म्हणतां येत नाहीं; कारण हा राजकवि कोणातरी " दुष्यंता " चा मिंधा स्तुतिपाठक होता. काव्य लिहावें तें यश, कीर्ति, धनलाभ यासाठीं लिहावें असें स्वतःच म्हणणारा हा कवि व्यक्तित्वाच्या प्रगटीकरणाची उठाठेव कशाला करील ?

" मुक्त आविष्काराचें " निश्चित स्वरूप काय ? हा प्रश्न वरील आक्षेपानें उभा राहतो. माझें उत्तर असें कीं कलात्मक आविष्कारांतील हा मुक्तपणा मिंधेपणासारख्या बाह्य उपाधींनीं नष्ट होणारा नाहीं. मिल्टनचा आंधळेपणा किंवा सावरकरांचा बंदिवास या उपाधींनींहि तो मुक्तपणा मर्यादित देखील झालेला नाहीं. याचें कारण हा मुक्तपणा **बाह्य नसून कलानिर्मितीच्या प्रक्रियेंत अंतर्भूत व अंगभूत आहे.** हा मुक्तपणा किंवा स्वातंत्र्य कलावंताला कोणी दिलेलें नसतें; म्हणूनच तें कोणाला हिरावून घेतां येत नाहीं.

ह्या कलात्मक स्वातंत्र्यालाहि बाध येऊं शकतो. पण तोहि ' आंतूनच ' येतो. बालकवींचें उदाहरण घ्या. ' पारवा ', ' औदुंबर ', ' पांखरास ' इत्यादि कवितांमध्यें बालकवींचा आत्मा मुक्तपणें प्रगट झालेला आहे. परंतु ' धर्मवीर ' या कवितेंत तो नाहीं. ही नीरस कविता लिहितांना केशवसुतांच्या ' तुतारी'चे पडसाद बालकवींच्या ' प्रतिभेला ' प्रेरणा देत होते व आर्यधर्माचा अभिमान व अभिनिवेश स्फुरण देत होता हें सर्व खरें; पण बालकवी स्वतः जणूं काय ' गैरहजर ' होते. त्यांचें व्यक्तित्व ही कवितां रचली जात असतांना कोठेंतरी सांदींत पडून होतें, असें म्हणावें लागतें—इतकी निर्जीव ही कविता आहे !

वरील उदाहरणासारखीं अनेक उदाहरणें सर्व कवींच्या व महाकवींच्या काव्यसंभारांतून शोधून काढतां येतील. व स्वतःच्या व्यक्ति-त्वाशीं प्रतारणा करून अशा रचना करण्याचा मोह कवींना होईल व होतो हें दिसतेंच. पण " अशी प्रतारणा कर " असें कवीला कोणी सांगितल्यामुळें प्रतारणा घडते असें मात्र नाहीं. दुसरें म्हणजे प्रतारणा घडून झालेली रचना ही कलाकृतीच नसते. सारांश, कलावंताचें स्वातंत्र्य ही एक स्वयंसिद्ध व अबाधित गोष्ट आहे व या स्वातंत्र्याची जपणूक दुसऱ्या कोणी करावयाची नसून कलावंतानें स्वतःच करावयाची असते, असा माझा निष्कर्ष आहे.

## कलावंतावर सामाजिक टीका

कलावंताचें स्वातंत्र्य अबाधित असतें असें सांगितल्यावर कोणी म्हणेल कीं मग कलाकृतींवर सामाजिक, राजकीय, नैतिक अशी कसली टीका कोणी व कां करावयाची ? त्या टीकेचा उद्देश काय व उपयोग तरी काय ? या प्रश्नांचा आतां विचार करूं.

कलावंतानें आपलें व्यक्तित्व काव्यरूपानें प्रगट केल्यावर त्याची सामाजिक प्रतिक्रिया सुरू होते. कलाकृतींत प्रगट झालेलें व्यक्तित्व सामाजिक संस्कारांनीं घडविलेलें असतें; पण तें प्रगट व्यक्तित्व हेंच आतां एक नवा सामाजिक 'संस्कार' किंवा शक्ति बनतें. बंकीम बाबूंचें 'वंदे मातरम्' हें गीत म्हणजे केवढें प्रचंड सामर्थ्य बनलें? तें कशामुळें? तर त्या गीतानें हजारों–लाखों भारतीयांना निर्भय व वीर बनविलें–लाखोंच्या व्यक्तित्वाला आकार व उदात्तपणा देण्याचें सामर्थ्य या गीतांत होतें; असें आज आपल्याला दिसतें. साहजिकच या गीताच्या रूपानें प्रगट झालेलें बंकीमबाबूंचें महान् व्यक्तित्व हें भारतीयांना आदरणीय वाटतें.

काव्याचें सामाजिकदृष्ट्या मूल्यमापन होतें,तें वरील कार्यकारणभावामुळें. सामाजिक टीका, आदर, तिरस्कार किंवा मार्गदर्शन ह्याचा उद्देश कलाकृतींचें सामाजिक मूल्यमापन करून कलावंताच्या व्यक्तित्वाबद्दल समाजाचें मत व्यक्त करणें हा असतो. या मूल्यमापनाचा एक उपयोग असा कीं समाजालां स्वतःसाठीं या कलाकृतींचा पूर्ण उपभोग घेतां येतो. ज्या कलाकृति उदात्त भावनांचें व आदर्शांचें पोषण करणाऱ्या असतील त्यांचा गौरव करणें व हीन कृतींचा अनादर करणें ह्या क्रिया समाजानें करावयास पाहिजेतच. वाचक म्हणून समाजांतील बहुसंख्य जनतेनें, टीकाकार म्हणून मोजक्या तज्ज्ञांनीं, कलावंत म्हणून कलानिर्मिति करणाऱ्याच्या सहकाऱ्यांनीं, तसेंच समाजशास्त्रज्ञांनीं व वेगवेगळ्या सामाजिक संस्थांच्या व पक्षांच्या धुरीणांनीं कलाकृतींचें हें मूल्यमापन जागरूकपणानें व कसोशीनें केलेंच पाहिजे.

सामाजिक टीकेमुळें दुसरा उपयोग असा होऊं शकतो कीं ज्या व्यक्तित्वावर टीकेचा रोख असतो, त्या व्यक्तित्वावर टीकेचा सुपरिणाम होणें शक्य असतें. व्यक्तित्व ही स्थिर व विकासशून्य बाब नसल्यामुळें सामाजिक मार्गदर्शन हें कलावंत व्यक्तीला उपकारकच ठरण्याचा संभव असतो. निदान तसें मार्गदर्शन करण्याचा समाजाचा हक्क व समाजावरील ही जबाबदारी अमान्य करतां येणार नाहीं.

## कलास्वातंत्र्य व नागरिक स्वतंत्र्य

आतांपर्यंत जें विवेचन केलें त्यावरून कलावंताचें कलात्मक स्वातंत्र्य व त्याचें नागरिकस्वातंत्र्य यांतील स्पष्ट फरक उमगून येईल. कलात्मक स्वातंत्र्य हें समाजानें व्यक्तीला दिलेल्या नागरिक स्वातंत्र्याहून वेगळें आहे. तें कलानिर्मितीच्या प्रक्रियेंत अंगभूत आहे व तेवढ्यापुरतीच त्याची व्याप्तीहि आहे. कलानिर्मितीची क्रिया पुरी झाल्यावर त्या क्रियेचें फळ (म्हणजे कलाकृति) ही सामाजिक टीकेचा विषय बनल्यानें कलात्मक स्वातंत्र्याला बाध येत नाहीं, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. उदाहरणार्थ, बंदिवासांत किंवा परतंत्र देशांत निर्मिलेली कलाकृति जरी नागरिक स्वातंत्र्याच्या दृष्टीनें बंधनांत असली तरी कलानिर्मितीच्या दृष्टीनें तिचा जन्म कलात्मक स्वातंत्र्यांतच झालेला असतो.

केवलकलावादी (किंवा कलेला समाजनिरपेक्ष मानणारे लोक) असें मानतात कीं कलावंत हा पूर्णपणें स्वतंत्र असला पाहिजे. त्यांना असें म्हणावयाचें असतें कीं कलानिर्मिति हा 'मुक्त आविष्कार' असला पाहिजे व त्यासाठीं कलावंताच्या व्यक्तित्वावर किंवा कृतिवर बंधन किंवा टीका होऊन चालणार नाहीं. त्यांच्या या मागणीच्या बुडाशीं कलात्मक स्वातंत्र्य व नागरिकस्वातंत्र्य या भिन्न कल्पनांची सरमिसळ आहे, असें मला वाटतें. त्यांना आविष्काराचें जें 'स्वातंत्र्य' हवें असतें तें निर्मितीच्या वेळींच कलावंतानें उपभोगिलेलें असतें. या गोष्टीची दखल केवलकलावादी लोकांना नसते, अशी माझी कल्पना आहे.

वरील विवेचनाचा असा अर्थ नाहीं कीं, नागरिकस्वातंत्र्याची उपेक्षा कलावंतानें करावी, किंवा त्याचा अपहार झाल्यास त्यानें इतर नागरिकांप्रमाणें निकराचा प्रतिकार करूं नये. नागरिकस्वातंत्र्यामुळें एकंदरींतच मानवी व्यक्तित्वाचा विकास होतो, ही गोष्ट कलावंतानें विसरून चालणार नाहीं. पण नागरिकस्वातंत्र्यासाठीं होणारे हे प्रयत्न कलात्मक स्वातंत्र्याच्या उपभोगापेक्षां वेगळ्याच कोटींतले आहेत याची त्यानें दखल ठेवावी. उदा-

हरणार्थ, नागरिकस्वातंत्र्य हें समाजसापेक्ष आहे; त्याच्या जोडीला नागरिकजविन व राष्ट्रीय जविन चालूं ठेवण्याची जबाबदारी नागरिकांवरच आहे, याची जाणीव कलावंत नागरिकालाहि ठेवली पाहिजे. तसेंच आपल्या हातून सामाजिक द्रोहाचा गुन्हा घडूं नये अशी खबरदारी त्यानें घेतली पाहिजे. कारण हें सर्व नागरिकस्वातंत्र्याच्या पोटींच ओघानें येतें. असें न मानलें तर नागरिकस्वातंत्र्याच्या मिषानें अराजकाचें स्वातंत्र्य कलावंत मागत आहे, असा त्याचा अर्थ होईल—आणि केवलकलावादी लोकांच्या विरुद्ध जनमताचा आज कौल आहे, तो यासाठींच कीं त्यांना अराजकाचें स्वातंत्र्य हवें आहे असें लोकांना वाटतें व सकारणच वाटतें.

## सोव्हिएत लेखक झोशेंको

येथपर्यंत कलावंताच्या स्वातंत्र्यासंबंधीं मी जे विचार मांडले त्यांच्या अनुरोधानें झोशेंको या सोव्हिएत लेखकासंबंधीं कांहीं विवेचन करणें उपयुक्त ठरेल. ह्या लेखकाचा परिचय तेथील वाचकांना क्रांतीच्या पूर्वीपासून होता. क्रांतीनंतरहि या लेखकाची लोकप्रियता वाढत गेली. सन १९४३ पर्यंत याला चांगला मान होता. परंतु तेव्हांपासून त्याच्या लिखाणावर टीका होत गेली व शेवटीं सन १९४६ झालीं लेनिनग्राडच्या सोव्हिएत–लेखक–संघ या संस्थेंतून त्याला काढून टाकण्यांत आलें.

सन १९४६ पर्यंतचें या लेखकाचें सर्व लिखाण व्यंग्योक्तीच्या स्वरूपाचें होतें व त्यांत लैंगिक लंपटपणांत लडबडलेलीं क्षुद्र पात्रें व त्यांचे ओंगळ मनोव्यापार व व्यवहार यांचें वर्णन असे. या पात्रांच्या रूपानें झारच्या अमदानींतील रंगेल, नीच व क्षुद्र व्यक्तींचीं चित्रें झोशेंको रंगवीत आहे असा सोव्हिएत वाचकांचा समज होत राहिला. कारण त्याच्या लिखाणांतल्या उपहासाचा रोख फार छद्मी तऱ्हेनें वळविलेला होता. वरवर पाहतां जुन्या अवशिष्ट नीच व्यक्तींचा झोशेंको उपहास करीत आहे असें वाटलें, तरी खरोखर तो सर्व मनुष्यजातीचाच उपहास करीत होता.

सन १९४३ च्या आधीं त्यानें लिहिलेल्या एका पुस्तकाचें नांव "एका थेरड्याची अखेर" असें आहे व त्यांत या थेरड्यानें मरेपर्यंत केलेल्या बासष्ट व्याभिचारांची किळसवाणी कथा आहे. त्यानंतर "सूर्योदयापूर्वी" ही त्याची कादंबरी प्रसिद्ध झाली. त्यांतहि तोच प्रकार आहे. या कादंबरीनें मात्र सर्वसाधारण वाचकांचेहि डोळे उघडले व ज्या टीकाकारांनीं झोशेंकोवर शस्त्र धरलें होतें त्यांची टीका प्रभावी होऊं लागली. याच वेळीं जर्मनीशीं घनघोर युद्ध चालूं होतें. त्यामुळें झोशेंकोच्या रंगेल व ध्येयशून्य पात्रांचे व्याभिचार वाचून लोकांना संतापहि आला. देशासाठीं खंबीर ध्येयवादानें लढणाऱ्या जनतेला या लेखकाच्या कलाकृतींची व व्यक्तित्वाची किळस आली यांत मला नवल वाटत नाहीं.

## लेखकसंघाचा गाफीलपणा

सन १९४३ पासूनच सोव्हिएत वाङ्मयांत झोशेंकोवर प्रहार करणारे अनेक टीकाकार लिहूं लागले होते. पण झोशेंको ज्या लेखकसंघाचा सभासद होता तो संघ मात्र या बाबतींत झोपून राहिला. याचें कारण काय? तर मला वाटतें कीं लेखकांच्या बाबतींत तेथील एकंदरींतच असें धोरण आहे कीं प्रत्येकाला आपल्या आवडत्या पद्धतीनें लिहूं द्यावें. त्यानें जीं अधम वृत्तीचीं पात्रें रंगविलीं तशीं माणसें प्रत्यक्ष सोव्हिएत समाजांत आढळलीं असतीं व त्या दृष्टीनें त्याच्या पात्रांनाहि 'वास्तववादी' चित्रें म्हणणें शक्य होतें. मिस् मेयोला हिंदुस्थानांतलें अमंगळ तेवढेंच सत्य निवडून जगापुढें मांडतां नाहीं कां आलें?

लेनिनग्राडच्या लेखकसंघानें झोशेंकोच्या कृतींवर व व्यक्तित्वावर कोरडे न ओढतां चालढकल केली, एकदोन दिवस नाहीं तर कांहीं वर्षें स्वस्थ बसून घालविलीं, यांत संघाचा गाफिलपणा झाला असें कां म्हणावयाचें? तर लेखकसंघ म्हणजे नुसता साहित्यिकांचा चव्हाटा किंवा अड्डा नव्हे. त्याचें कामच हें कीं नव्या व जुन्याहि लेखकांना निर्मितीसंबंधानें विधायक मार्गदर्शन करावयाचें, नवे लेखक शिकवून तयार करावयाचे. व जुन्यांपैकीं कोणी जर कलात्मकतेच्या व व्यक्तित्वाच्या दृष्टीनें घसरत असतील तर त्यांनाहि सांवरावयाचें.

## साहित्यांत हुकूमशाहीचें भय

झोशेंको हा सोव्हिएत साहित्यामधल्या एका नासक्या व मरूं घातलेल्या प्रवृत्तीचा प्रतिनिधि आहे. त्याच्यासारख्या एका लेखकाच्या पतनाबरोबरच हजारों जुन्या व नव्या सोव्हिएत लेखकांच्या उज्ज्वल कलात्मक कामगिरीचें दृश्य सोव्हिएत वाङ्मयाच्या अभ्यासकांसमोर उभें राहतें. परंतु झोशेंकोचें उदाहरण मी मुद्दाम घेतलें. सोव्हिएतमध्यें लेखकाला किती स्वातंत्र्य व विकासाचीं साधनें उपलब्ध आहेत हें सांगण्यापेक्षां झोशेंकोसारख्या लेखकालाहि कसें वागविण्यांत येत आहे तें पहा, असें मी म्हणेन. या विक्षिप्त, विकृत व मानवद्वेष्ट्या लेखकाला इतक्या वादळानंतर व गाफिलपणानंतर आज संघांतून वडतर्फ करण्यांत आलें आहे. पण त्याचें नागरिकस्वातंत्र्य व लेखनाचें स्वातंत्र्यहि कायम आहे. आपल्या व्यक्तित्वाला झालेली विकृति तो घालवूं शकेल कीं नाहीं हें "भविष्यकाळ ठरवील" असें लेनिनग्राड–संघाचे प्रमुख मि. झास्ल्वास्की यांचे उद्‌गार आहेत. संघाचे सभासद नसलेल्या नव्या व जुन्या लेखकांना संघाकडून आर्थिक साहाय्य मिळत राहतें. त्यामुळें 'अप्रत्यक्ष'-पणें झोशेंकोवर अन्याय होण्याचाहि संभव नाहीं.

इतकें सारें असून आज हिंदुस्थानांत किंवा इतरत्रहि असा दृढ समज आहे कीं सोव्हिएत समाजासारखी नियोजित, जागरूक व ध्येयप्रवण समाजरचना असली कीं साहित्याच्या क्षेत्रांतहि नियोजन म्हणजेच हडेलहप्पी व हुकूमशाही असणारच! माझ्या मतें, तेथील साहित्याविषयीं एवढेंच म्हणतां येईल कीं तेथील वाचक, टीकाकार, प्रकाशक व लेखक हे असंघटित, प्रवाहपतित व परस्परांविषयीं साशंक किंवा उदासीनहि नाहींत. उलट, एकेकट्या कलावंताला या सर्वांचेंच संघटित व जागरूक साहाय्य तेथें मिळत आहे. एरेन्बुर्गसारखा आंतरराष्ट्रीय कीर्तीचा जुना लेखकहि जर्मन लोकांसंबंधीं सूडभावनेचा प्रचार करूं लागला, त्याबरोबर तेथील वाचकांनीं व लेखकांनीं त्याला त्याची चूक स्पष्ट दाखवून दिली व त्यानें ती मोकळ्या मनानें कबूलहि केली. असें जागरूक, सर्वगामी व सडेतोड मार्गदर्शन इतर कोठलाहि समाज आपल्या लेखकांना करीत आहे, असें मला दिसत नाहीं.

या मार्गदर्शनालाच हुकूमशाही म्हटलें तर मग इलाज नाहीं! मी प्रारंभींच्या तात्त्विक विवेचनांत या आक्षेपाला असें उत्तर दिलें आहे कीं कलाकृति व कलावंतांचें व्यक्तित्व हें सामाजिक टीकेला व मार्गदर्शनाला पात्र असे विषय आहेत व असें मार्गदर्शन झालें तरी कलात्मक स्वातंत्र्य पूर्णतः अबाधित राहतें. माझ्या मतें सोव्हिएत समाजांत कलावंताचें कलात्मक स्वातंत्र्य तर स्वभावतःच अबाधित आहे, पण शिवाय त्याचें नागरिकस्वातंत्र्यहि नुसतें सुरक्षितच नाहीं तर तेथील सुदृढ व कार्यक्षम अशा लोकशाहीमुळें तें विकसित अशा अवस्थेंत आहे.

## आपली स्थिति

सोव्हिएट किंवा कोठल्याहि साहित्याकडे आपण फक्त आपल्या येथील परिस्थितीच्या चष्म्यांतून पहाणार, हें साहजिकच आहे. येथें आज असें दिसतें कीं केवलकलावाद्यांची अराजक स्वातंत्र्याची मागणी एकीकडे चालूं आहे. उलटपक्षीं, समाजवादी, राष्ट्रवादी व हिंदुत्ववादी अशा बोधवाद्यांकडून "तेजस्वी" किंवा "वास्तववादी" वाङ्मयाची मागणीच लेखकानें पुरविली पाहिजे असा हट्ट धरला जात आहे. त्यामुळें कलानिर्मितीचें स्वातंत्र्य व नागरिक-स्वातंत्र्य यांतला भेदहि लोकांना दिसेनासा झाला आहे व सोव्हिएत वाङ्मयांत हुकूमशाही आहे अशा तऱ्हेचे समजहि रूढ होत आहेत. यासाठींच वरील विवेचन मी वाचकांसमोर मांडलें आहे. (जास्त माहितीसाठीं "सोव्हिएट लिटरेचर" या इंग्रजी मासिकाचा एप्रिल १९४७ अंक, पानें ३८ ते ५० पहा. तसेंच "मॉडर्न क्वाटर्ली" मासिकाचा व्हॉ. २, नं. १ १९४६-४७, पानें ७४ ते ८४ पहा).










# खलील जिब्रान

अनुवादक : ना. ग. जोशी

## 'असणें' म्हणजे—

" 'असणें' म्हणजे डोळस बोटांचा विणकर होणें, प्रकाश अन् क्षेत्र यांची काळजी असणारा गवंडी होणें, पेरल्या जाणाऱ्या प्रत्येक बीबरोबर एखादा खजिनाच गुप्तपणें ठेवीत आहों असें वाटणारा एखादा शेतकरी होणें, पकडलेल्या माशाची नि पशूची कींव करणारा पण असें असूनही मानवाऱ्या भुकेविषयीं नि गरजेविषयीं जास्त करुणा वाहणारा कोळी नि शिकारी होणें होय.

" आणि सर्वांत जास्त महत्त्वाचें मी हें समजतों. तुम्हांपैकीं प्रत्येकजण एकमेकाच्या हेतुपूर्तीसाठीं सहभागी झाला पाहिजे. कारण अशा योगानेंच तुमचा सद्धेतु साध्य होण्याची आशा आहे.

" माझ्या मित्रांनो नि प्रियजनांनो, निर्भय व्हा व गरीब बनूं नका; मोठ्या मनाचे व्हा नि संकुचित राहूं नका; आणि माझ्या व तुमच्या अंतघडीपर्यंत आपल्या महत्तर आत्म्याचा आविष्कार करीत राहा. "

—" पैगंबराचा बगीचा* " छेदक १३

* * *

## कांहींहि निर्जीव नाहीं

" तूं 'जड निर्जीव वस्तु' असें कां म्हणालास? तूं एवढा दीर्घकाल या बगीच्यांत राहिलास आणि अजूनहि तुला हें उमगलें नाहीं का कीं येथें कांहींहि निर्जीव नाहीं? सर्व वस्तु दिवसाच्या सम्यक् ज्ञानांत आणि रात्रीच्या राजवैभवांत जगतात नि तळपतात. तूं नि तो पत्थर एकच आहांत—छातींमध्यें पडणाऱ्या ठोक्यांत फक्त फरक आहे. तुझ्या हृदयांतील ठोके जरा जलद पडतात, नाहीं का, मित्रा? तरीपण तें तेवढें प्रशांत नसतें.

" त्याच्यांतील लयतत्त्व हें निराळ्या लयीचें असेल; परंतु तुला असें सांगतों कीं तूं जर आपल्या अंतरंगाचा ठाव घेतलास आणि अवकाशाचीं शिखरें पायाखालीं घातलीस तर तुला केवळ एकच मधुर संगीत ऐकावयास येईल आणि त्या संगीतांतच पाषाण अन् तारका एकमेकांच्या साथीनें संपूर्ण संवाद साधून गात असतील.

" जर माझे शब्द तुझ्या आकलनशक्तीच्या पलीकडे असतील तर ते पुन्हां उषा उगवेपर्यंत तसेंच राहूं देत. आपल्याच आंधळेपणामुळेंच तूं जर या दगडाला नांवें ठेवीत असशील तर मग तुझें डोकें आकाशांत तारकेवर आदळण्याचा प्रसंग आल्यास तूं त्या ताऱ्यालाहि शिव्याशाप देशील! पण असा एक दिवस उगवेल कीं जेव्हां दरींतील कदंबफुलें गोळा करणाऱ्या एखाद्या बालकाप्रमाणें तूं दगडधोंडे नि नक्षत्रतारे गोळा करीत हिंडशील आणि मग तुला प्रचीति येईल कीं हे सर्व पदार्थ सजीव अन् सुगंधी आहेत."

—" पैगंबराचा बगीचा* " छेदक १०

* या ग्रंथांतील साहित्यगुणांविषयीं याच अंकांतील श्री. ना. ग. जोशी यांचा " 'बगीच्या'कडे दृष्टिपात " हा लेख बघावा.

—का. सं.








# ‘बगीच्या’कडे दृष्टिपात

श्री. ना. ग. जोशी, एम्. ए.

‘प्रॉफेट’चा लेखक खलील जिब्रान याच्या मनांत प्रॉफेटविषयीं तीन ग्रंथ लिहावयाचे होते. त्यापैकीं ‘प्रॉफेट’ (जीवनदर्शन) व ‘पैगंबराचा बगीचा’ हीं लिहून झालीं. ‘प्रॉफेट’ तर तो लहानपणापासून लिहीत होता. अरबी भाषेमध्यें त्याचीं बरींच संस्करणें करून नंतर पुन्हा इंग्रजींत त्यानें तें लिहिलें व मग प्रसिद्ध केलें. नंतर ‘पैगंबराचा बगीचा’ स्फुट छेदकांच्या रूपानें लिहून झाला. पण परिच्छेदांची जुळवणी व योजना त्याची सुहृद्—बार्बरा यंग—हिनें केलेली आहे.

## “न च कश्चित् शृणोति माम्”

तिसरें पुस्तक ‘डेथ ऑफ दि प्रॉफेट’ (पैगंबराचा मृत्यु) लिहून झालें नाहीं. फक्त एक वाक्य लिहिलें गेलें:—

“And he shall return to the city of Orphalese.........and they shall stone him in the marketplace, even unto death, and he shall call every stone a blessed name.”

तरी या एकाच वाक्यावरून जिब्रानची कल्पना कोणत्या दिशेनें जात होती तें स्पष्टपणें कळून येतें. बहुतेक ध्येयवाद्यांना व धर्मसेवकांना व्यासांप्रमाणेंच आक्रोश करावा लागतो. जिब्रानच्या प्रॉफेटला तसाच आक्रोश करावा लागला. ‘बगीच्या’च्या शेवटीं प्रॉफेटचे सर्व शिष्य त्याला सोडून जातात; पैगंबर अतिशय उद्विग्न होतो. अखेरीस त्याच्या तोंडून कळवळून उद्गार निघतात, “मरणाच्या पलीकडचें जीवन मी जगणार.” परंतु त्याचा विश्वास दांडगा, श्रद्धा असीम आहे. आपल्या चैतन्यशक्तीवर त्याची श्रद्धा आहे व आपलें जीवितकार्य या ना त्या रूपानें पुरें होणारच अशी त्याची खात्री आहे. म्हणून बगीच्याच्या शेवटीं विजनवासांत असलेला तो पैगंबर पुन्हा (‘पैगंबराचा मृत्यु’ या अलिखित ग्रंथांत सुचविल्याप्रमाणें) लोकांमध्यें येणार आहे. पण तोंपर्यंत लोक विथरलेले असतील. “आणि तो आर्फालीझ नगरांत परत येईल...... तेव्हां लोक त्याला बाजारपेठेंत दगडांनीं ठेचून काढतील नि शेवटीं त्याचा वध करतील. पण तो मात्र प्रत्येकें दगडागणिक मंगल वचनच बोलेल.” व्यासांनीं आक्रोश केला; इतर अनेक द्रष्टे कळवळून बोलले. तेंहि ‘अरण्यरुदन’ ठरलें. येशूला तर शासनकर्त्यांनीं खांबावर खिळे ठोकून मारलें. जिब्रानच्या पैगंबराचें जीवनही असेंच संपावयाचें होतें. सामान्य जनता व लोकोत्तर द्रष्टे यांच्या विचारकक्षेमधील अंतर त्याला कारण आहे. आब्राहाम लिंकन हा एक असाच द्रष्टा होता. तो अत्यंत लोकप्रिय होता. त्याला कुणी वेड्यानें नाट्यगृहांत गोळी घातली. त्यानें एकदां पुढील उद्गार काढले आहेत. “तत्त्वाच्या दृष्टीनें स्वातंत्र्याबद्दलची आपली भावना पूर्वीसारखी राहिली नाहीं....आपल्याला स्वतंत्र व्हायचें होतें, तेव्हां ‘सर्व माणसें समान होत’ हें एक स्वयंसिद्ध तत्त्व आहे असें आपण मानलें. पण आतां त्याच सिद्धान्ताला ‘एक स्वयंसिद्ध असत्य’ मानूं लागलों आहोंत.” जिब्रानने एके ठिकाणीं म्हटलें आहे, “सॉक्रेटीस, येशू, जन्दार्क (जोन ऑफ आर्क) आणि लिंकन—जगताला माहीत असलेल्या चार सर्वांत सुंदर








विभूति नि त्यांचाच वध करण्यांत आला ! आणि त्यावेळीं अंतरिक्षाच्या ओठावर हास्य तरळलें ! '' सामान्य जनतेच्या श्रद्धेवर ज्या तत्त्वांची मदार असते त्या तत्त्वांच्या (किंवा कल्पनांच्या) प्रवर्तकांना करुण प्रसंगाला तोंड द्यावें लागतें. असाच आणखी एक द्रष्टा आज स्वतंत्र हिंदी संघराज्य सोडून पाकिस्तान संघराज्यांत रहावयास जायची इच्छा करीत आहे. स्वातंत्र्याच्या आनंदमय वातावरणांत अत्यंत असुखी व अस्वस्थ जीव तोच आहे.

## 'बगीच्यां'तील सूत्र

'पैगंबराच्या बगीच्यां'त रचनेच्या दृष्टीनें सूत्रबद्धता आणण्याचें कार्य बार्बरा यंग या जिब्रानच्या समानशील मैत्रिणीनें केलें आहे. निरनिराळ्या वेळीं सुटे लिहिले गेलेले भाग एका सूत्रांत ओवून त्यांची माला गुंफण्याचें कार्य तिनें उत्तम प्रकारें केलें आहे. स्वतः जिब्रान त्यामुळें खूप झाला होता. प्रथम प्रॉफेट आर्फालीझला परतल्याचें वर्णन आहे. मग तो एकटाच आपल्या आईच्या आवडत्या बगीच्यांत ध्यानस्थ बसतो. त्याच्याजवळ कोणी जाऊं शकत नाहीं—फक्त करीमा नांवाची त्याची बाळसंवगडी त्याच्या खाण्यापिण्याची वास्तपुस्त करावयास तेथें जाते. पण दरवाजा बंद. शेवटीं आपल्या मित्रांनीं आंत यावें म्हणून प्रॉफेट दरवाजा उघडतो. तेथें त्याचे पूर्वीचे नऊ सोबती त्याचे शिष्य म्हणून येतात. त्यांना प्रसंगाप्रसंगानें मानवप्राणी व निसर्गसृष्टि यांमधील संबंध—अनुबंध व रहस्य तो उघडें करून सांगतो. पण तें सर्व त्यांना रुचत नाहीं, किंवा उमजत नाहीं म्हणा. त्याचें ' राष्ट्र 'विषयींचें अविस्मरणीय प्रवचन यांतील एक भाग आहे. त्यांतील ' नऊ अनुकंपनीय गोष्टी ' (Nine Pities) जिब्रानच्या विचाराचे खास नमुने आहेत. त्याचा तो वारंवार उल्लेख करीत असे. शेवटीं त्या सर्व शिष्यांची लौकिक व्यवहाराची आसक्ति प्रबळ झाली. प्रत्येकाला आपला पोटाचा व्यवसाय साद घालूं लागला. आपल्या पुण्य गुरूला सोडून जातांना त्यांना फारसें वाईट वाटल्यासारखें दिसत नाहीं. आपले शिष्य गेलेले पाहून पैगंबराला मात्र अतिशय वाईट वाटलें. आपल्या ज्ञानाचा साठा सर्वांना वाटून द्यावा अशी त्याची मनापासूनची इच्छा. आपल्याजवळील मधु त्यांनीं लुटावा, आपल्या फलभारांतील फलें त्यांनीं स्वीकारावीं व आपला भार हलका करावा अशी त्याची मनीषा. मग सर्व शिष्य त्याला सोडून जातात. एक करीमा तेवढी तेथें राहते. पैगंबर हा दैवी पुरुष आहे, करीमा ही मानवी श्रद्धेची, मानवी कोमलतेची मूर्ति आहे. जिब्रानच्या अमर निर्मितींपैकीं करीमा ही एक उत्कृष्ट निर्मिति आहे. तिला उद्देशून तो जे उद्गार काढतो ते जिब्रानच्या उत्कृष्ट भावकाव्यशक्तीचे नमुने आहेत. इतकी उत्कटता, जिव्हाळा, वेदना आपणांस उत्कृष्ट साहित्यावांचून कोठें आढळणार ?

## बाह्यान्तरसृष्टीमधील अद्वैत .

अन्तर्गत सूत्राच्या अनुरोधानें पाहतां जी गोष्ट प्रामुख्यानें नजरेस पडते ती ही कीं, या पुस्तकांत पैगंबरानें मानव आणि निसर्ग यांमधील संबंध, जड आणि चेतन सृष्टीमधील अनुबंध सूचित केले आहेत. आणि ते अशा स्वरूपाचे आहेत कीं त्यांची अनुभूति उत्स्फूर्त आहे, साक्षात्कारांनीं होणारी आहे असें आपणांस वाटल्यावांचून राहत नाहीं. या तऱ्हेच्या लेखनांत जिब्राननें जें नावीन्य आणलें आहे, तें अनुपम आहे. केवळ परंपरागत संकेत देत न बसतां किंवा वाहेरून आणलेल्या तत्त्वज्ञानाचे पडसाद ( ते आत्मसात् न झाल्यामुळें ) कृत्रिमपणें उमटवीत न बसतां जिवंत सहानुभूतीनें आणि विशाल दृष्टिकोनानें बाह्यान्तर सृष्टीमधील हें अद्वैत जिब्राननें पैगंबराच्या प्रवचनांतून आविष्कृत केलें आहे. परमाणुस्फोटाच्या या जमान्यांत जड मानल्या गेलेल्या अणूंमध्यें केवढें चैतन्य आहे याची आपणांस पुरेपूर कल्पना आली आहे. जड आणि चैतन्य असा द्रव्याद्रव्यांत फरक करण्याची पद्धति विज्ञानशास्त्रांतहि हळूहळू कमी होत असून एकीकडून द्रव्याकडे चेतनगुणानें—लहरींच्या आवर्तनस्वरूपानें—पाहण्याची वैज्ञानिकांची दृष्टि असून, दुसरीकडून परमाणुसंहतीच्या स्वरूपांतहि ते, त्याला पाहतात. पण हें वैज्ञानिक स्वरूप कांहींहि असलें तरी, तेंच व तशाच स्वरूपांत तें जिब्रानला अभिप्रेत होतें असें म्हणण्याचें कारण नाहीं. शास्त्रज्ञांची सत्यवस्तु शोधण्याची रीत वस्तु-








निष्ठ असते, कल्पनेनें जाणलेल्या गोष्टी प्रत्यक्षवादी व प्रयोगनिष्ठ निकषावर घासून नवीन ज्ञानें किंवा प्रमेयें ते स्वीकारतात. कलावंतांची प्रतिभा त्या सत्तत्त्वाच्या सौंदर्यमय अंगाचा आत्मनिष्ठ वृत्तीनें अनुभव घेते आणि त्या अनुभूती पुन्हां कलानिर्मितीच्या रूपानें इतरांना निवेदन करते. श्रद्धावंतांची भावशक्ति अशीच आत्मलक्षी असते; तीहि उत्स्फूर्त मानसिक ( किंवा आत्मिक ) आविष्काराच्या द्वारां सत्तत्त्वाचा साक्षात्कार करून घेते. असे हे अनुभव साहित्यांत रूपकद्वारां किंवा अन्योक्तिद्वारां प्रकट केले जातात; किंवा गूढवादी भावकाव्याच्या वाहनाचा आश्रय करून ते व्यक्त होतात. आपल्या अंतःशक्तीनें दिव्यध्वनीचें केलेलें गूढ श्रवण भक्ताचें किंवा कवीचें हृदय गानरूपानें व्यक्त करतें—जणूं त्याहि ' श्रुति 'च होत. दिव्यचक्षूंनीं निरीक्षिलेल्या रहस्यांचें प्रकटीकरण असेंच दर्शनांच्या रूपानें होत असतें. अशा तऱ्हेच्या साक्षात्कारी दर्शनांचा अनुभव आपणांस जिब्रानच्या ' पैगंबराच्या बगीच्यां 'त वारंवार येतो. ' वसंताचें आगमन होतांच ' इत्यादि भागांतील व बांडगुळें व दंवबिंदु यासंबंधीचें अप्रतिम गद्यकाव्य, शिष्यानें दगडधोंड्याला उद्देशून काढलेल्या उद्गारांच्या अनुषंगानें आलेलें विवेचन, काल व अस्तित्व यांविषयींचीं प्रवचनें आणि ' फलभारानें माझें हृदय मारावलें आहे ', 'मरणाच्या पलीकडील जीवन मी जगणार' 'नीहारिके, ताई, ' इत्यादि गीतें यांमध्यें जिब्रानच्या जीवनदर्शनाचाच आपणांलाही साक्षात्कार घडतो.

## मनाची अतिसाधारण ( Supernormal ) बाजू

कांहीं वेळां रूढ कल्पना-प्रतिमांचा उपयोग करून तुलनेनें किंवा रूपकानें त्यांमधील सूक्ष्मार्थ ध्वनित केला जातो. कांहीं वेळा संदिग्ध, अगम्य अशा वाटणाऱ्या शब्दप्रतिमांच्या द्वारां त्या भावगम्य साक्षात्कारांची किंवा गूढरम्य अनुभवांची पुनर्निर्मिति केली जाते. स्वाभाविकपणेंच अशा अभिव्यक्तींत मूळ भावदर्शनांतील रहस्यमयता तशीच राहते. संपूर्णपणें तार्किक प्रक्रियेला धरून त्यांची मांडणी नसते. केवळ सहजस्फूर्त ' प्रतिभे'च्या ( Genius या मानसिक व मानसशास्त्रीय शक्तीच्या ) साहाय्यानें आकलन झालेल्या त्या गोष्टी तर्कातीत असतात आणि म्हणूनच कांहींना तर्कदुष्ट वाटतात. अशा तऱ्हेची ही तर्कातीत शक्ति म्हणजे मानवी व्यक्तिमत्त्वाचा एक अजून अज्ञात राहिलेला पैलू आहे, असें तज्ज्ञांना आतां वाटूं लागलें आहे. तर्कशुद्ध विज्ञानदृष्टीलाहि अमान्य करतां येत नाहींत अशा कित्येक प्रयोगांत ' अगम्य ' म्हणजेच सध्यांच्या विज्ञानक्षेत्रांतील ज्ञानसाधनांना आकलन न होणाऱ्या अशा कांहीं गोष्टी घडल्या. घडलेल्या गोष्टी संशयातीत शास्त्रसाधनांनीं प्रस्थापित झाल्या पण त्यांमागील मानसिक व शास्त्रीय प्रक्रिया अगम्य राहिली. आजपर्यंतच्या शास्त्रीय प्रयोगांच्या कक्षेंत न आलेल्या कोठल्यातरी अद्यापि अज्ञात राहिलेल्या मनोविशेषामुळें त्या घडल्या असाव्या असा विचारवंतांचा तर्क आहे. म्हणूनच शुद्ध शास्त्रदृष्टीचा स्वीकार करणारे डॉ. अलेक्सिस् कॅरलसारखे नोबेल पारितोषिक मिळविणारे संशोधक नि ग्रंथकार आतां असें म्हणूं लागले आहेत कीं, अशा या अतीन्द्रिय म्हटल्या जाणाऱ्या गोष्टीच्या बुडाशीं कोणती भौतिक प्रक्रिया असावी, याचाहि विचार शास्त्रज्ञांनीं केला पाहिजे. प्रो. अत्रेय या मानसशास्त्रज्ञ प्राध्यापकांनीं यावर एक चांगला प्रबंध—' सुपरनॉर्मल फॅक्टर्स इन् दि ह्युमन पर्सनॅलिटी '—लिहिला असून त्यांत त्यांनीं अशा अनुभवांचें वर्गीकरण केलें आहे. त्यांच्या मतें मानवी मनाच्या जशा ' Abnormal—विकृत ' व ' Subnormal—साधारणच्याहून खालचें ' अशा दोन बाजू आज मानसशास्त्रज्ञ मानतात, तशीच एक तिसरी बाजू ' Super-normal—अतिसाधारण' अशी असून तिच्यामुळेंच कित्येक माणसांकडून (माध्यमांकडून), 'साधारणा' (Normal)कडून अपेक्षित नसलेल्या, म्हणजेच शास्त्राला व तर्काला ज्यांचें स्पष्टीकरण देतां येत नाहीं अशा गोष्टी घडतात.

## जिब्रान हा जीवनवादी (Life-ist)

यांतील अंतिम सत्य कांहींहि असो. स्वतः जिब्रान अशा तऱ्हेचा माध्यमरूप मनुष्य प्रत्यक्षपणें होता कीं काय माहीत नाहीं. पण त्याला कांहीं विलक्षण अनुभव आल्याचें त्यानें आपल्या सोबतिणीजवळ सांगितलें होतें. ' जीझस, दि सन ऑफ मॅन ' या पुस्तकासाठीं काढलेल्या येशूच्या मुखाचें








चित्र हें त्यानें अशा तऱ्हेनें अनुभवलेल्या दर्शनांची प्रतिकृति होतें. हें सबंध पुस्तक लिहून होत असतां तो जणूं भारला गेलेला होता. त्याला वाटे कीं आपण येशूच्या जीवनांतील ते ते प्रसंगच अनुभवीत आहोंत, त्या त्या व्यक्तींशींच बोलत चालत आहोंत. एकदां त्याला वाटलें कीं आपणच जुडास आहोंत. त्याला नेहमीं वाटे कीं आपण त्यावेळीं होतों. येशू आणि त्याच्या काळची स्थिति यांच्याशीं तन्मय झाल्यामुळें कदाचित् असेल, कदाचित् तो त्याच पैगंबराच्या लॅबनॉन देशांतील असल्यामुळें त्यांच्यांत येशूचाच कांहीं समान अंश असेल, पण जिब्रानच्या श्रद्धामय दिव्यचक्षूंनीं जीवनाचें जें दर्शन घेतलें व इतरांना घडविलें, तें केवळ अपूर्व आहे, यांत शंका नाहीं. ‘ प्रॉफेट ’मध्यें मानवामानवांतील संबंधाचें दर्शन आहे. ‘ गार्डन ऑफ दि प्रॉफेट ’ मध्यें मानव व निसर्गसृष्टि यांमधलि संबंधांचें विवेचन आहे. ‘ दि डेथ ऑफ दि प्रॉफेट ’ मध्यें मानव आणि देव यांमधलि संबंध त्याला स्पष्ट करावयाचे होते. हें सर्व ज्या प्रतिभेच्या कक्षेंत आलें, तिची विशालता सामान्यांच्या पलीकडचीच म्हटली पाहिजे. जिब्रान अंतःकरणाचा खरा ख्रिस्ती होता. ख्रिस्तावर त्याची अमर्याद श्रद्धा होती. तो जरी कट्टर किंवा पंथनिष्ठ ख्रिस्ती नसला तरी तो ख्रिस्तीधर्म—ख्रिस्ताचा धर्म—मानीत होता. त्याचें खरें वर्णन करण्यासाठीं त्याच्या मैत्रिणीनें त्याला ‘ साक्षात्कारी ख्रिस्ती ’ ( Christian mystic ) म्हटलें आहे. स्वतः जिब्रान मात्र आपलें वर्णन I am a life-ist ‘ मी एक जीवनवादी आहे ’ या शब्दांनीं करतो. ख्रिस्ती होणें म्हणजे जीवनवादी होणेंच होय. जिब्रानचें जीवनदर्शन साक्षात्कारवादी आहे आणि जिब्रानचा साक्षात्कार जीवनदर्शी आहे. त्याची सन्मैत्रीण बार्बरा यंग हिनें आपल्या ‘धिस मॅन फ्रॉम लॅबनॉन ’ या सुंदर ग्रंथांत याविषयीं लिहितांना पुढील आठवण लिहिली आहे.

“ कुणी तरी त्याला एकदा विचारलें, ‘ गूढवादी म्हणजे काय ? ’ तेव्हां तो हसला आणि म्हणाला, ‘ फार गुप्त किंवा अचाट असें कांहीं नाहीं—केवळ असा कोणीतरी कीं जो ‘ आणखी एक पडदा ’ दूर करतो. ’

“ एकदां तो म्हणाला, ‘ तीनदां मी आपल्या प्रभूला नि बंधूला—ख्रिस्ताला—पाहिला आहे. मी त्याच्याशीं संभाषण केलें आहे.’

“ आणि जिब्राननें सात वर्षांच्या अवधींत फक्त एकदांच मानवाला असह्य होणाऱ्या भारानें भारावला जाऊन नाइलाज म्हणून म्हटलें: ‘फक्त आजच एकदा, सबंध जन्मांत, त्या गोष्टी मला कुणाला तरी सांगितल्यावांचून राहवत नाहीं. पण तूं मात्र त्यांचा उच्चार केव्हांहि करूं नयेस—मी मेल्यावरहि करूं नयेस.’

“ आणि म्हणून त्या तीन गोष्टी सांगणें अशक्य आहे.”

स्वतः जिब्रानचीच इच्छा त्या गूढ दर्शनाला आपल्या अपवित्र जिज्ञासेनें स्पर्श करूं नये अशी असल्यामुळें आपण तर्कवितर्क न करणेंच बरें. पण यावरून एवढें निश्चित कळतें कीं अशा तऱ्हेची कांहीं शक्ति त्याच्याजवळ होती. त्याच्या डोळ्यांत एक तेजस्वी चमक कित्येक वेळां त्याच्या मैत्रिणीला दिसे. यावरून त्याला कांहींतरी विलक्षण आध्यात्मिक अनुभव येत असले पाहिजेत, हें अतिशय संभवनीय दिसतें. त्याची सूक्ष्मदर्शी जीवनदृष्टि किती उदात्त होती, याची आपणांस कल्पना आहेच. आपल्या अनुपम ग्रंथांतून आणि उज्ज्वल चित्रांतून त्यानें जें गूढ रहस्यमय वातावरण खेळविलें आहे, त्याचा उगम अशा अनुभूतींतच असणें शक्य नाहीं का ? तो अतिशय संवेदनाक्षम व श्रद्धावन्त असा कलाकार होता. आपल्या अपूर्व शक्तीनें त्यानें आपल्या कृतींत जीवाजीवांमधील, जीव-जगत् यांमधील आणि जीव व ईश्वर या दोहोंतील संबंधांचें अश्रुतपूर्व ज्ञान सांठविलें आहे. त्यामागील मानसिक प्रक्रिया ‘ जिज्ञासा ’ नि ‘ आत्माविष्कार ’ यांनीं युक्त असेलहि. भावनांच्या उत्कटतेचें उन्नयन झाल्यामुळें तें साध्य झालें असेलहि. स्वाभाविक मनोवृत्तींचें उदात्तीकरण होऊन मग त्याच्या त्या उन्नत व्यक्तित्वांतून हीं ज्ञानदर्शनें प्रकट झालीं, असें मानावयाचें असल्यास मानावें. अशा तऱ्हेच्या असामान्य ‘ प्रतिभे ’चें मानसशास्त्र शोधून काढण्याचा प्रयत्न अवश्य व्हावा. भौतिक ज्ञानाला गम्य असलेल्या साधनांनीं जर त्याचें स्पष्टीकरण गवसलें तर फारच उत्तम. पण तें जोंपर्यंत सांपडत नाहीं, तोंपर्यंत आपण त्याचें








अतीन्द्रिय स्वरुप गृहीत धरुन चालावें--ज्यांना तसे अनुभव आल्याचा पुरावा आहे त्याच्या बाबतींत तरी अनावश्यक संशय घेऊन वागूं नये. आणि स्पष्टीकरण मिळालें किंवा न मिळालें तरी त्या प्रतिभेमुळें स्थूल जीवनव्यवहारामागील मूल्यांचें जें आत्मिकरण झालें आहे, त्याची योग्यता कमी होण्याचें कारण नाहीं.

## साक्षात्कारी अनुभव

साक्षात्कारवादाविषयीं ज्यांनीं अभ्यास केला आहे, त्याविषयींचे बोल जे स्वानुभूतीनें सांगतात अशा कांहीं थोर तत्त्वविचारकांचें असें म्हणणें आहे कीं खरा साक्षात्कार आणि असलीं ही कलादर्शनें यांचा कांहीं संबंध नाहीं. खरे साक्षात्कारी प्रत्यक्ष साधकच होत. कलावंत हे फार तर साक्षात्कारवादी, साक्षात्कारप्रवण असतील. कलावंतांना जें 'जीव, जगत् व ईश्वर' यासंबंधींचें ज्ञान होतें, तें साक्षात्कारसदृश असेल, पण प्रत्यक्ष आत्मिक साक्षात्कारामुळें आलेलें असूं शकत नाहीं. त्यांच्या भावनावश, श्रद्धाशील मनोवृत्तीमुळेंच त्यांना तसे कांहीं आभास झाले एवढेंच. आपल्याकडील श्री. रवीन्द्रनाथ हे असे लेखक आहेत कीं ज्यांनीं व्यक्तिशः असे साक्षात्कारी अनुभव आल्याचें नमूद करून ठेवलें आहे. त्यांचे वडील महर्षि देवेन्द्रनाथ तर साधक होतेच. त्यांच्यापासून रवीन्द्रांनीं प्रेरणा घेतली होती. त्यांनीं अतींद्रिय अनुभवांची शक्तीहि साध्य करून घेतली असण्याची पूर्ण शक्यता आहे. ते घटकाघटका ध्यानस्थ बसत; व अशाच एका उत्कट क्षणाला त्यांना मंडलाकार ज्योतिश्चक्राचा साक्षात्कार झाल्याचें नमूद आहे. उलट जिब्रानने असे कांहीं प्रयत्न केले असल्याचा उल्लेख नाहीं. जें होत होतें तें स्वाभाविक रीतीनेंच होत होतें. त्याला कांहीं दर्शनें घडलीं, ती सहजीं घडलीं. कोठल्याहि यौगिक किंवा अन्य मार्गांनीं 'चित्त-वृत्तींचा निरोध' केल्यामुळें तें घडल्याचा पुरावा नाहीं. मग हें कसें साध्य झालें? जिब्रानच्या बाबतींत तो भावविवशतेचा परिणाम म्हणून गृहीत धरलें तरी दुसरा एक प्रश्न शिल्लक राहतो. तो हा कीं आजपर्यंत जे जे साधुसंत साक्षात्कारी मानले गेले, ज्यांनीं ज्यांनीं भक्तीच्या उमाळ्यानें ईश्वराचें स्तवन करतांना असे अनुभव गायिले, ते ते सर्वच्या सर्व योगाभ्यासी साधक होते काय? त्या सर्व मंडळींनीं प्रयत्नपूर्वक योगसाधना केल्यामुळेंच ते साक्षात्कारी झाले काय? भारतवर्ष व त्याबाहेरील देश यांमध्यें अनंत साधुसंत झाले, त्या सर्वांनीं असे अनुभव घेतले व तसें लिहून ठेवलें. तें लिहिलेलें जर खरेंच मानावयाचें तर त्या अनुभवांची साक्षात्कारी शक्ति कशी असामान्य करावयाची? चोखामेळा 'अंत्यज' होता, शेख महंमद 'अविंध' होता, कान्होपात्रा 'वाराङ्गना' होती. या सर्वांनीं योगसाधनाच केली असें कोठें सिद्ध झालें आहे? व त्यांच्या एकंदर लौकिक परिस्थितींत तें कितपत शक्य होतें? त्यांच्या स्वभावतः भावुक असलेल्या मनाला गुरुभक्तीच्या योगानें योग्य वळण लागलें असेल. पण त्यांना मिळलेला गुरुमंत्र केवळ नाममहिम्याचाच होता. 'भजो रे भय्या राम-गोविंद-हरी। जप-तप-साधन कछु नहि लागत' हें कबीर वचन याचेंच निदर्शक होय. म्हणून असें वाटतें कीं, साधनेमुळें येणाऱ्या अनुभवांना द्यावयाचें तें महत्त्व देऊनहि अशाप्रकारें स्वभावधर्मानेंच जे अनुभव येतात त्यांचेंहि महत्त्व गौण मानूं नये.

## " सौन्दर्याची अभिव्यक्ति करा "

साक्षात्कारी संत व साक्षात्कारवादी कलावंत यांमध्यें एक फरक मात्र बऱ्याच वेळां व बऱ्याच प्रमाणांत आढळतो आणि तो अनुभूतींच्या अभिव्यक्तींत दिसतो. त्यामुळें मूळ अनुभूतीच वेगळ्या प्रकारच्या, असें समजण्याकडे प्रवृत्ति होते. संतांची किंवा साक्षात्कारी द्रष्ट्यांची वृत्ति सत्यप्रतिपादनाची असते आणि आपले अनुभव केवळ प्रकट करून त्यांतील अर्थ इतरांना सांगणें हें त्यांचें कार्य असतें. या अनुभवांमागील तात्त्विक बैठक किंवा सूत्रेंच त्यांना वाचकांना समजावून द्यायचीं असतात. कलावंतांची किंवा साक्षात्कारवादी प्रतिभावंतांची दृष्टि आपले अनुभव सौंदर्यपूर्ण तऱ्हेनें लोकांना सांगण्याची असते. त्यांचे अनुभव सौंदर्यतत्त्वावर अधिष्ठित असतात. प्रतीतिधर्मी संतांची दृष्टि सत्यान्वेषणाची असते, तर प्रतीतिवादी कलावंतांची दृष्टि सौंदर्यान्वेषणाची असते. एकाच मूलभूत तत्त्वाच्या दोन बाजूंकडे हे दोन तऱ्हेचे साक्षात्कारवादी पहात असतात. अनुभव सर्वांगीण असूनहि








अभिव्यक्ति विशिष्ट मनोवृत्तीप्रमाणें होणें स्वाभाविक आहे. कोठल्या बाजूवर भर दिला जातो यावर त्याचा वर्ग अवलंबून असतो. एवढ्यापुरता या दोहोंतील फरक मान्य करावा लागेल. मात्र सत्यधर्माची ज्योत तेवत ठेवणारे संत व सौंदर्यधर्माची पताका फडकत ठेवणारे कलावंत हे अनुभूति घेतात ती एकाच परमतत्त्वाची होय, सर्व गुणांनीं सजलेल्या अशा अंतिम ‘सत्ते’ची होय व त्या तत्त्वाचें ‘ सौंदर्य ’ हें एक प्रधान अंग आहे. म्हणूनच जिब्रान म्हणतो : “ सौंदर्याची अभिव्यक्ति करा.” त्याची अशी श्रद्धा आहे कीं मानवजातीच्या जाणीवपूर्ण हेतूंत व उत्पादनकार्यांत जर सौंदर्यधर्माचें पालन होत राहील तर जगांत न्याय, दया आणि पूज्यभाव यांचें महान् पुनरुत्थान होईल. याच जाणिवेनें त्यानें आपली कलासृष्टि निर्मिली, साहित्यसृष्टि नटविली. यंत्रविद्येच्या आहारीं गेलेल्या या युगांत हें काम अत्यंत अवघड आहे, याची त्यास पूर्ण कल्पना आहे. तरीहि त्याची अशी निष्ठा आहे कीं, “सौंदर्यापलीकडे अन्य धर्म नाहीं कीं अन्य शास्त्र नाहीं. ” या उद्गारांवरुन जिब्रानची मनोवृत्ति स्पष्ट होते. ‘ पैगंबराच्या बगीच्यां ’त या सौंदर्यदर्शनाची परमावधि आहे. यांत अंतर्बाह्य सृष्टींतील सौंदर्याचा आविष्कार आहे; आणि तो आविष्कार इतका उदात्त नि उन्नत आहे कीं त्यामागील अनुभूति साक्षात्कारी प्रतीतीच होय, असें आपणांस वाटावें नि पटावें. ह्यांतच या ग्रंथाचें श्रेष्ठत्व आहे. शेवटशेवटचा भाग अत्यंत उज्ज्वल प्रतीचा झाला आहे. साहित्यांतर्गत सौंदर्याचें तें एक मोहक दर्शन आहे.

## एक भव्य जीवनदर्शन

‘ गार्डन ऑफ दि प्रॉफेट ’ हा एक ‘ स्फूर्तीचा ’ उमाळा आहे असें जिब्रानच्या मैत्रिणीचें मत आहे. बार्बरा यंग लिहितात, “ लिहावयाचा मजकूर प्रत्यक्षपणें कोणा निश्चित व सुसंज्ञ जाणीवेंतून त्याला लाभत होता; आणि खलील जिब्राननेंच एकदां म्हटल्याप्रमाणें ‘ त्यांत अपरिहार्य शब्दांची अनिवार्य स्थलीं योजना ’ झालेली होती. ” जिब्रानच्या चैतन्याची आत्मकथा जर आपणास पाहावयाची असेल तर ती ‘ प्रॉफेट ’ आणि ‘ गार्डन ऑफ दि प्रॉफेट ’ या ग्रंथांतील अलमुस्ताफाच्या व्यक्तित्वांत आपणांस दिसेल, असेंहि त्यांचें निश्चित मत आहे. जिब्रानच्या मैत्रिणीप्रमाणेंच त्याच्या सर्व सहृदय वाचकांनाहि असें वाटल्यावांचून रहात नाहीं. जिब्रानचें व्यक्तित्व प्रत्येक छटेंत चमकून जातें. त्याची चेतना प्रत्येक पानांत तरळते. त्याची सबंध साहित्यसृष्टि हें त्याचें एक भव्य जीवनदर्शन आहे. या जीवनदर्शनाच्या विशिष्ट बाजू विशिष्ट ग्रंथांत दिसतात; पण सर्व मिळून समग्र जीवनाचें दर्शन होतें. ‘ पैगंबराच्या बगीच्यां’त या जीवनदर्शनांमधील सौंदर्यदृष्टीची महत्ता व्यक्त होते. म्हणून साहित्यगुणांच्या दृष्टीनें तें अव्वल दर्जाचें झालें आहे. या सौंदर्यदर्शनांत सश्रद्ध व सहानुभूतिपूर्ण रसिकाला समाधानाचा ठेवा लाभेलच. पण बुद्धिनिष्ठ व शास्त्रदृष्टीच्या वाचकालाहि तें हृदयंगम वाटेल आणि अगदीं गूढगुंजनविरोधी वृत्तीच्या सहृदयालाहि त्याच्या वाचनानें आनंदाची प्राप्ति होईल.* मात्र अशा तऱ्हेच्या साहित्यांतील सूचक ध्वनि अचूक ग्रहण करण्याएवढी आपली वृत्ति संस्कारयुक्त व सहानुभूतिपूर्ण पाहिजे. माझ्यासारख्या—प्रत्यक्ष साक्षात्कार झाला आहे असा दावा करूं न शकणाऱ्या साधारण माणसालाहि त्यांतील साहित्यगुण अप्रतिम वाटले व त्यांचें मोठें आकर्षण मनावर उत्पन्न झालें. तेव्हां इतरांनाहि तें असाध्य आहे असें मानण्याचें कारणच नाहीं. जिब्रानची दृष्टि अधिक स्पष्ट व्हावी म्हणून त्याची निरनिराळ्या विषयांसंबंधींचीं मतें अवतरणरुपानें पाहण्यासारखीं आहेत.

‘ कष्ट, गुंतागुंत आणि सुखसंवेदक वेदना यांमधूनच कवितेची निर्मिति होते नि तिच्यायोगेंच हृदयाला शांति लाभते.’

---

*श्री. आ. रा. देशपांडे (‘फुलवात’ प्रस्तावना), श्री. वा. ना. देशपांडे ( ‘निवेदन’-गु. ह. देशपांडेकृत याची प्रस्तावना.) या दोघांचें विवेचन पहिल्या दोन वृत्तींचें निदर्शक असून, कै. डॉ. माधवराव पटवर्धन ( केशवसुतांवरील लेख, अर्वाचीन मराठी साहित्य ) ह्यांचा लेख तिसऱ्या वृत्तीचा द्योतक आहे. जिज्ञासूंनी तीनहि लेख वाचावे.








' स्वतंत्रता अशी आहे कीं जिच्या चरणापाशीं मानवांनीं सदासर्वदा युद्धेंच केलीं आहेत, आणि सुंदरता अशी आहे की जिच्या सन्मुख माणसें सर्वांबरोबर बंधुत्वाच्या भावनेनें हस्तांदोलन करीत आलीं आहेत. '

' कलात्मक कृति म्हणजे एक नहिरपटल होय, ज्यावर प्रतिमा तयार केली जाते.' 'कला हें निसर्गापासून अनंताकडे टाकलेलें पाऊल आहे. '

' येथें आपल्या सभोंवर्ती पसरलेला आहे त्यापेक्षां निराळा असा स्वर्ग आपण कल्पूं शकूं ? ही अतुलनीय सृष्ट वसुंधरा म्हणजे ईश्वराच्या परमाविशाल स्वप्नांचा प्राणच होय.' 'या धूसर वसुधेंतून उगवणारे सर्व पदार्थ, मुळें, झाडें, फांद्या, प्रत्येक कळी, प्रत्येक फळ नि तृणपर्ण हीं सर्व माझी संतति आहेत आणि माझी आवडतीं आहेत. '

' जर अंतराळांत एकच तारका असती, जर सर्वदा शुभ्र वर्णानें उमललेलें एकच फूल असतें, नि जर मैदानांत एकच झाड उगवलें असतें, आणि शंभर वर्षांत केवळ एकदांच वर्फ पडलें असतें, तर आपणाला अनंताच्या उदारतेची ओळख पटली असती. '

' आजची कला म्हणजे एकादेंच शतक जुनी झालेली जवळ जवळ धार्मिक वाटणारी तृषा होय, कीं जी आजचा मानव व उद्यांचा महत्तर मानव यांमधील सोनेरी दुवा आहे.'

' वस्तु जशा आहेत अस वाटतें त्याविरुद्ध पुकार म्हणजेच प्रतिभा होय.'

" काल ही ' आज 'ची स्मृति होय
आणि ' उद्या ' हें ' आज 'चें स्वप्न होय "

—खलील जिब्रान "

( कोलोरॅडो कॉलेजमधील चर्चच्या भव्य घंटेवर कोरलेले ज़िब्रानचे शब्द )

---

# कुरूपपणा म्हणजे काय ?

" मित्रा, जर एखादा माणूस तुझ्या दारावरून जात असतांहि दरवाजावर टिचकी मारीत नसेल, तर तो तुला आतिथ्यहीन कसा म्हणूं शकेल ?

" आणि जर कुणी तुझ्याजवळ न समजणाऱ्या भाषेंत बोलूं लागेल, तर तो तुला बहिरा अन् लक्ष न देणारा कसा मानूं शकेल ?

" ज्याला तूं कुरूपपणा म्हणतोस तें असेंच कांहीं नाहीं का कीं ज्याच्याजवळ जाण्याचा तूं कधींहि प्रयत्न केलेला नाहींस आणि ज्याच्या अंतरंगांत शिरण्याची तुला केव्हांहि इच्छा झाली नाहीं ?

" कुरूपतेंत जर कांहीं तथ्यांश असला, तर तो हाच आहे कीं ता म्हणजे आपल्या डोळ्यावरील झापड आहे व आपल्या कानाला बंद करणारें मेण आहे.

" मित्रा, तूं कशालाहि कुरूप म्हणूं नकोस, मात्र एखाद्या आत्म्याची आपल्याच स्मृतींसमोर प्रकट होणारी भीति यांतून ( अपवाद म्हणून ) वगळावयास पाहिजे. "

खलील जिब्रान ( अनु:——ना. ग. जोशी )

' पैगंबराचा बगीचा ' छेदक ६










# दिवाळीचा इतिहास

प्रा. परशुराम कृष्ण गोडे, एम्. ए.

[ प्रस्तुत लेखकानें दिवाळी उत्सवासंबंधीं इंग्रजींतून तीन निबंध लिहिले आहेत. (१) Some Notes on the history of दिवाळी Festival (between C. A. D. 50 and 1945 (Annals of B. O. R. I. Vol. xxvi. pp. 216-262. (२) "The सुखसुप्तिका of the आदित्यपुराण and the नीलमतपुराण. (AD. 500-800) and its relation to modern दिवाळी Festival." Journal of the Jha Institute, Allahabad. Vol. III. Part 2 pp. 205-216. (३) "The दिवाळी Festival" Bharatiya Vidya, Bombay Vol. VIII. Nos. 3&4 pp. 53-73. प्रस्तुत लेख हा तिन्ही निबंधांचा सारांश असून तो प्रो. वि. म. बेडेकर, कार्यकारी संपादक 'नवभारत', यांनीं तयार केला आहे. ].

आपण जे सण किंवा उत्सव साजरे करीत आलों आहोंत, त्यांना राष्ट्रीय व सामाजिक जीवनांत अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे. या सणांत आनंदानें समाजांतील बहुसंख्य लोक भाग घेतात व त्याचा परिणाम राष्ट्रांतील व समाजांतील जीवन सांस्कृतिकदृष्ट्या एकजीव, एकसंधी करण्यांत हळूहळू होत जातो. म्हणून सणांचा इतिहास तपासून पाहणें सांस्कृतिक दृष्ट्या फार उद्बोधक आहे. आतांपर्यंत मराठींत असे प्रयत्न झाले आहेत. परंतु त्यांचा भर सणांच्या वर्णनावरच असलेला आढळून येतो. त्या सणांची प्राचीनता, इतिहासांतून त्यांचे येणारे उल्लेख खुलासेवार उलगडून दाखविण्याचा पद्धतशीर प्रयत्न अजूनपर्यंत झालेला नाहीं. प्रस्तुत लेखकानें दिवाळीच्या सणापुरता त्याला उपलब्ध झालेल्या साधनांवरून एकत्रित केलेला इतिहास मांडण्याचा जो प्रयत्न इतरत्र केला आहे, त्याचा सारांश या निबंधांत दिला आहे.

## यक्षरात्रि म्हणजे दीपालिका
### [ इ. स. पांचवें शतक ]

दिवाळीसंबंधीं उपलब्ध उल्लेखांतील प्राचीन असा उल्लेख वात्स्यायनाच्या कामसूत्रांत आला आहे, असें सिद्ध करतां येतें. कामसूत्रकार वात्स्यायनाच्या काळाबद्दल पंडितांमध्यें एकवाक्यता नाहीं. त्यासंबंधीं पंडितांचीं मतें बघतां इ. स. ५० पूर्वी आणि इ. स. ५०० नंतर त्याचा काळ नेतां येत नाहीं. कामसूत्रामध्यें सणांची किंवा उत्सवांची यादी दिली आहे. त्यांत तीन उत्सव मोठे उत्सव (माहिमनी क्रीडा) असे गणले गेले आहेत. यक्षरात्रि, कौमुदीजागर व सुवसंतक. यक्षरात्रि हा उत्सव कार्तिक शुद्ध प्रतिपदेस साजरा करतात असें त्याचें वर्णन केलें आहे. या रात्रीं यक्षांचें सान्निध्य असतें असा समज असून यालाच सुखरात्रि असें म्हणत असत व ही रात्र लोक द्यूत खेळून साजरी करीत असें वर्णन आढळतें. 'यक्षरात्रि' हाच आपला दीपोत्सव

१ "यक्षरात्रिरिति सुखरात्रिः यक्षाणां तत्र संनिधानात् । तत्र प्रायशो लोकस्य द्यूतक्रीडा" --यशोधरकृत जयमंगला (कामसूत्रावरील टीका)








असावा, ह्याला एक पुरावा सांपडतो. गुजराथमध्यें सन १०८८ ते ११७२ मध्यें हेमचंद्र नांवाच्या कोशकारानें आपल्या देशीनाममाला नांवाच्या ग्रंथांत ' जक्खरत्ती ' ( यक्षरात्रिः ) म्हणजे दीवाली किंवा दीपालिका असें म्हटलें आहे. ज्यांत 'यक्षरात्रि' शब्द आला आहे ती प्राकृत गाथा[१] अशी आहे.—

मणिवलएहि कुणन्ती जंघाछेअम्मि जक्खरत्तिं व।
जणोहणाण वि तुमं णिसि जच्छंदेण किं डरासि॥३५॥

देशीनाममाला (बां. सं. सीरिज पान १४८)

पुरुषोत्तमदेव नांवाच्या ११५९ च्या आधीं होऊन गेलेल्या ग्रंथकारानेंही आपल्या त्रिकांडशेष नांवाच्या ग्रंथांत यक्षरात्रि म्हणजे दीपाली असेंच म्हटलें आहे. हे दुवे एके ठिकाणीं जोडले असतां दिवाळीचा प्राचीन उल्लेख इ. स. ५०० पर्यंत सांपडतो असें म्हणतां येईल.

यानंतर दिवाळीसणाचा उल्लेख कनोजच्या श्रीहर्षवर्धनाच्या नागानंद नांवाच्या नाटकांत सांपडतो. त्यांत ४ थ्या अंकांत[२] विश्वावसु महाराज दीप-प्रतिपदुत्सवाच्या दिवशीं आपल्या मुलीला व जावयाला दिवाळसणानिमित्त अहेर देऊं इच्छितात, असा उल्लेख आहे.[३] श्रीहर्षवर्धनानें इ. स. ६०६ ते ६४८ पर्यंत राज्य केलें. त्यानें रचलेल्या नागानंदांतील हा उल्लेख ७ व्या शतकांतील आहे असें समजण्यास हरकत नाहीं.

कालक्रमानुसार यापुढील उल्लेख नीलमत पुराणांतील आहे. राजतरंगिणीकार कल्हण (इ. स. ११४८) यानें नीलमतपुराणाचा आपल्या ग्रंथाकरितां आधार घेतला असून नीलमतपुराण त्याच्यापूर्वी कित्येक शतकें म्हणजे सहाव्या किंवा सातव्या शतकांत रचलें गेलें असावें. नीलमतपुराणांत[४] दीपोत्सवाचें वर्णन केलें असून दिवाळीच्या पहिल्या दिवशीं देवालयांत दीपवृक्ष व जिकडे तिकडे दीपमाला लावाव्यात, सुंदर वसनें परिधान करून आप्तेष्टमित्रांसह सुग्रास भोजन करावें, दुसऱ्या दिवशीं द्यूत खेळावें, गीतवादन श्रवण करावें वगैरे दिवाळीचें थाटाचें वर्णन आहे.

## नवरात्रानंतर दिवाळी [इ. स. १० वें शतक]

सोमदेवसूरि नांवाच्या दाक्षिणात्य ग्रंथकारानें राष्ट्रकूट घराण्यांतील तिसरा कृष्ण याच्या कारकीर्दीत रचलेल्या आपल्या यशस्तिलकचंपू नांवाच्या ग्रंथांत दीपोत्सवाचें फार काव्यमय असें बहारीचें वर्णन केलें आहे. हा ग्रंथकार सुमारें इ. स. ९५० त होऊन गेला. शरदृतूंत महानवमी म्हणजे नवरात्र संपल्यावर येणारा दीपोत्सव—" ज्यावेळीं उभारलेल्या पांढऱ्या ध्वजांचें सौन्दर्य शरदृतूंत आकाशांत विहार करणाऱ्या हंसांच्या रांगामुळें द्विगुणित झालें आहे, उमललेल्या कमलांनीं सुशोभित झालेल्या लक्ष्मीच रमणीयत्व ज्यांत भरून राहिलें आहे, ज्यांत प्रासादांचें सुधाधवल सौंदर्य दीपप्रकाशांत झळकत आहे, ज्यांत द्यूतांतील विजयोन्मादानें हर्षित झालेल्या कामिनींची त्यांचे प्राणेश विनवणी करीत आहेत, ज्यावेळीं विलासिनींच्या नानाप्रकारच्या भूषाप्रकारांना बहर आला आहे, ज्या काळांत गीतवाद्यांच्या मंगल निनादानें दशदिशा दुमदुमत आहेत, असा हा दीपोत्सव, हे राजा, आपला आनंद वाढवो व मनोरथ पूर्ण करो. " असें दीपोत्सवाचें वर्णन केलें आहे.

## मुसलमान लेखकांचे उल्लेख (११ वें व १२ वें शतक)

सुप्रसिद्ध मुसलमान प्रवासी अलबेरुनि (इ. स. १०३०) यानें आपल्या तहकीक–इ–हिंद (हिंदुस्थानविषयीं माहिती) या ग्रंथांत आपण प्रत्यक्ष पाहिलेल्या दिवाळीचें वर्णन केलें आहे. पानसुपारी, दानधर्म, दीपोत्सव वगैरेंचें वर्णन करून अलबेरुनीनें,

---

१ या गाथेचा संस्कृत अनुवाद असा—
मणिवलयैः कुर्वाणा चत्वरे दीपालिकाम् इव। राक्षसानां अपि त्वं निशायां स्वच्छन्देन किं त्रस्यसि॥

२ ' अस्मिन् दीपप्रतिपदुत्सवे मलयवत्या जामातुश्चैतदुत्सवानुरूपं यत्किंचित्प्रदीयते '।

३ Winternitz—History of Indian Literature Vol. I. पा. ५८३ पहा.

४ पा. ४२ ( लाहोर आवृत्ति १९२४ संपादक-रमणलाल व झड्डू )








दीपोत्सवाला बलिराज्य म्हणतात, असा उल्लेख केला आहे.

सुमारें ११५० मध्यें होऊन गेलेला पंजाबांतील मुलतानचा रहिवासी अब्दुल रहमन या लेखकानें अपभ्रंश भाषेंत ' संदेशरासक ' नांवाचें एक काव्य रचलें असून त्या काव्यांत एके ठिकाणीं दिवाळीचें फार सुन्दर वर्णन आलें आहे.

दिंतिय णिसि दीवालिय दीयय
णवससिरेहसरिस करि लीअय।
मंडिय भुवण तरुण जोइक्खिहि
महिलिय दिंति सलाइय अक्खिहिं ॥१७६॥

' चंद्रकोरीप्रमाणें (शशिरेखासदृश) असलेले दीप हातांत घेऊन ते स्त्रिया रात्रीं लावतात. त्या दिव्यांच्या प्रकाशानें जग सुशोभित होतें. स्त्रिया त्या दिव्यांचें काजळ शलाकेनें (काडीनें) आपल्या डोळ्यांत घालतात. '

## गोसाव्यांची दिवाळी

महानुभाव वाङ्मयांतील एक ग्रंथ ' लीलाचरित्र ' नांवाचा इ. स. १२५० च्या सुमारास रचला गेला. त्यांत एके ठिकाणीं महानुभावपंथाचा संस्थापक चक्रधर व त्याचे गोसावी शिष्य यांनीं साजऱ्या केलेल्या दिवाळीचें वर्णन आलें आहे. चक्रधरांची शिष्या महादाई हिनें आदल्या दिवशीं संध्याकाळीं पाणी भरून ठेवलें. दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहांटे गोसावी उठले, त्यांनीं अंगाला तैलमर्दन करून अभ्यंग स्नान केलें, नंतर महादाईनें सर्वांना ओवाळलें. त्यानंतरच्या दिवशीं भाऊबीज साजरी झाली. भाऊबीजेला महादाईनें आपल्या सर्व गोसावी-बंधूंना मोदक, आइत, लाडू, सेव वगैरे पक्वान्नांचें जेवण दिलें. हें सर्व वर्णन समाजांतील साध्या लोकांच्या—गोसाव्यांच्या—दिवाळीचें आहे. तें वाचून आपण हल्लीं जी दिवाळी साजरी करतों तिच्याशीं त्याचें किती हुबेहुब साम्य आहे तें लक्षांत येईल.

चक्रधराचा समकालीन हेमाद्रि नांवाचा एक संस्कृत महापंडित होऊन गेला. त्यानें आपल्या चतुर्वर्गचिंतामणि नांवाच्या संस्कृत ग्रंथांत यम-द्वितीयेचें वर्णन दिलें असून त्याला हवाला भविष्योत्तर पुराणाचा दिला आहे. यमद्वितीया म्हणजे भाऊबीज. कार्तिक शुक्ल द्वितीयेला यमाला त्याच्या बहिणीनें—यमुनेनें—आपल्या घरीं जेऊं घातलें, यमपुरींतील सर्वजण तृप्त झाले, पापांपासून व सर्व बंधनांपासून मुक्त होत्साते संतुष्ट झाले. या उत्सवाला यमद्वितीया म्हणतात. या दिवशीं—

स्नेहेन भगिनीहस्तात् भोक्तव्यं पुष्टिवर्धनम्।
दानानि च प्रदेयानि भगिनीभ्यो विधानतः ॥
स्वर्णालंकारवस्त्राणि पूजासत्कारभोजनैः ॥
चतुर्वर्गचिंतामणि अध्याय ६ वा.
(आवृत्ति Bib. India)

## प्राचीन मराठी वाङ्मयांतील दिवाळी

श्रीज्ञानेश्वरांनीं आपली ज्ञानेश्वरी सन १२९० त पुरी केली. त्यांच्या ग्रंथांत प्रकट झालेल्या अलंकारवैभवांत दिवाळीचें स्थान बघतां त्यांच्याकाळच्या दिवाळीच्या लखलखाटाची कल्पना येईल. दिवाळी ज्यांत उपमान आहे, अशा त्यांच्या ओव्या खालील-प्रमाणें आहेत.

मी अविवेकाची काजळी।
फेडुनि विवेकदीप उजळी।
तैं योगियां पाहे दिवाळी। निरंतर ॥ ४ ॥
—भिडे यांची आवृत्ति पा. १०६

सूर्यें अधिष्ठिली प्राची।
जगा राणीव दे प्रकाशाची
तैसी वाचा श्रोतयां ज्ञानाची।
दिवाळी करी ॥१२॥ भि. आ. पा. ५८३
तैसें होय तिये मेळीं।
मग सामरस्याचिया राउळीं।
महासुखाची दिवाळी।
जगेंसि दिसे ॥३८९॥ भि. आ. पा. १३५

ज्ञानेश्वरांचा समकालीन महानुभाव कवि नरेंद्र-कवि याला वसंतऋतूचें वर्णन करतांना दिवाळीच्या सुखाची आठवण झाली आहेः—

कीं ते संभोगसुखाची दिवाळी
विरहिणी धेंडेवाळियें[1] होती काजळी

---

[1] धेंडेवाळी = दिवाळीच्या दिवसांत गवताचा उंच भारा बांधतात आणि त्यावर दिवे लावतात.







जित-इंद्रियें हारवीति तिये वेळीं :
जूं वैराग्याचें ॥ ७३८ ॥

—रुक्मिणीस्वयंवर कोलते यांची आवृत्ति.

गुजराथमधील वर्धमानपुर (वढवाण) येथील मेरुतुंग या नांवाच्या ग्रंथकारानें आपल्या १३०५ सालीं झालेल्या प्रबंधचिन्तामणिनामक ग्रंथांत ११ व्या शतकांत होऊन गेलेल्या कोल्हापूरच्या राजाच्या दिवाळीमहोत्सवाच्या प्रसंगीं घडलेल्या गारुडाचें वर्णन केलें आहे. गुजराथच्या राजा सिद्धराज याच्या अद्भुतशक्तीबद्दल कोल्हापूरच्या राजानें शंका घेतली. हें कळल्यावर सिद्धराजानें आपल्या जादूविद्येची महती पटविण्याकरितां आपला एक अधिकारी कोल्हापुरास पाठविला. इतक्यांत दिवाळीचा उत्सव आला. त्या उत्सवांत कोल्हापूरच्या राण्या महालक्ष्मीची पूजा करावयास गेल्या असतांना त्या सिद्धराजाचा मनुष्य एकदम एका जादूगाराचें रूप घेऊन महालक्ष्मीच्या चबुतऱ्यावर आला आणि त्यानें कापूर, सोनें, रत्नें देवीला अर्पण केलीं. तेथें सिद्धराज नांव असलेलें एक महावस्त्र ठेवून तो एकदम अंतरिक्षांत अदृश्य झाला. राण्यांनीं हें वृत्त कोल्हापूरच्या राजाला सांगितल्यावर कोल्हापूरच्या राजानें घाबरून तें महावस्त्र आपल्या प्रधानांकरवीं सिद्धराजाकडे पाठविलें, वगैरे वर्णन मेरुतुंगानें केलें आहे.

## विजयनगरसाम्राज्यांतील दिवाळी
## (१५ वें शतक)

निकोलाय कोन्टी (Nicoloi Conti) या नांवाचा एक इटालियन प्रवासी विजयनगरला सन १४२०–२१ मध्यें आला होता. त्यानें आपल्या प्रवासवर्णनांत विजयनगरला साजऱ्या होणाऱ्या सणांचें वर्णन केलें असून दिवाळीमध्यें देवळांतून व देवळांच्या छपरांवरून रात्रंदिवस दिवे लावून ठेविले जात असत, असें वर्णन केलें आहे.

सुमारें सन १४५० ते १६५० च्या दरम्यान रचलेला आकाशभैरवकल्प नांवाचा एक विश्वकोशासारखा मोठा ग्रंथ उपलब्ध आहे. त्यांत विजयनगरसाम्राज्यकालीन सामाजिक व धार्मिक चालीरीतींचें वर्णन आलें आहे. त्यांत राजानें नरकचतुर्दशी व कार्तिक प्रतिपदा कशी थाटानें साजरी करावी यांचें केलेलें सविस्तर वर्णन आपल्या आधुनिक चालीरीतींशीं विलक्षण जुळतें. विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे राजानें आपापल्या मांडलिकांसहवर्तमान नरकचतुर्दशीच्या संध्याकाळीं बाणविद्येचे खेळ (दारुकाम) बघावे व त्यानंतर नाट्यशाळेंत नाटक बघावें असें वर्णन आहे.

सुमारें १५९० मध्यें अकबराच्या कारकीर्दींत ऐन–इ–अकबरी हा ग्रंथ रचला गेला. त्यांत दीपोत्सवाचें वर्णन असून त्याची तुलना मुसलमानांचा सण शाब–इ–बरात याबरोबर केली आहे. दिवाळीचा उत्सव हा विशेषतः वैश्यांचा महोत्सव आहे, असें त्यांत वर्णन आहे.

## पेशवेकालीन दिवाळी

महादजी शिंदे (१७२७–१७९४) यानें सवाई माधवरावांना पाठविलेल्या हकीगतींत राजपुतान्यांतील कोटा संस्थानच्या राजधानींत दिवाळी कशी साजरी करीत असत याचें वर्णन आढळून येतें. "दिवाळीच्या चार दिवसांत कोट्याचे महाराज आपल्या राजधानीच्या बाहेर दारूकामाचा बार उडवून देतात. त्याला दारूची लंका म्हणतात. रावणाची मूर्ति बनवून ती मध्यभागीं ठेवतात. राक्षसांच्या, वानरांच्या, आणि हनुमानाची एक मोठी–अशा सर्व दारूच्या प्रतिमा तयार करतात. नंतर हनुमानाचें पुच्छ पेटवून देतात व हनुमान उड्डाण करीत या दारूच्या लंकेंतील राजवाड्यांना आग लावून देतो." सवाई माधवरावांच्या सांगण्यावरून पर्वतीच्या पायथ्याशीं महादजी शिंद्यांनीं दारूची लंका उडविली व पुण्यांतील हजारों लोकांनीं ती पाहिली, असाहि तत्कालीन बखरींत उल्लेख आहे.

## जैनांची दिवाळी

जैनधर्मीयांच्या सणांतही दिवाळी हा एक प्रमुख सण गणला गेला आहे. त्यांच्या धर्मग्रंथांतून

---

१ Encyclopaedia of Religion and Ethics मध्यें Jain Festivals and Fasts वर Margaret Stevenson चा लेख पहा.



अनुक्रमणिका








दिवाळीसणाची उत्पत्ति सांगितलेली मनोरंजक आहे. जैन धर्माचे संस्थापक महावीर हे आश्विन अमावास्येला निर्वाण पावले. त्यांच्या निर्वाणसमयीं त्यांचे अनुयायी १८ राजे उपस्थित होते. " ज्ञानाचा दिवा आज मालवला. आतां जडवस्तु पेटवून आपण प्रकाश उजळवूं या. " असें म्हणून त्यांनीं दीपावली लावली. व अशा रीतीनें त्यांच्या दीपावलीमहोत्सवास सुरुवात झाली. महावीर हे खिस्तपूर्व ५२८–७ मध्यें निर्वाणास गेले. म्हणजे दीपावली महोत्सवाची उत्पत्ति आणखी ५०० वर्षें मागें जाते. या उत्पत्तीला ऐतिहासिक महत्त्व किती द्यावयाचें, जैनांची दिवाळी जुनी कां हिंदूंची दिवाळी जुनी, कोणी कोणाकडून घेतली, हे सर्व प्रश्न वादग्रस्त असून त्यांचा निर्णय सध्यां उपलब्ध असलेल्या प्रमाणांवरून लागणें शक्य नाहीं. तरी पण दीपावलीला महत्व किती आलें होतें हें समजण्यास या जैनमताचा उपयोग होईल.

## बृहद्भारतांतील दिवाळी

दीपावली महोत्सवाचें जनमनाला किती जबरदस्त आकर्षण आहे याची आणखी प्रचीति म्हणजे दीपावलीचा प्राचीन काळीं झालेला बृहद्भारतांत प्रसार हा होय. सयाममध्यें कार्तिकांत दोन उत्सव साजरे करितात. एक कार्तिकेयाचा उत्सव, व दुसरा दीपावली महोत्सव[१]. सयामी दीपावलीमहोत्सवांत एक प्रकार, जमिनींत उंच काठ्या पुरून त्या काठ्यांच्या शेंड्यावर टोंकाला आकाशदिवे लावतात व दुसरा प्रकार म्हणजे रात्रीं पाण्याच्या प्रवाहाबरोबर दिवे तरंगत सोडून देतात. आकाशदिव्यांचा उपयोग भुताखेतांचें निवारण करण्याकडे व भाताच्या शेतामधील पाणी अडवून ठेवण्याकडे होतो, अशी लोकांत समजूत आहे.

## शिल्पांतील दिवाळी

दिवाळीच्या वरील इतिहासाला वाङ्मयांतील पुरावे दिले आहेत. त्याला आणखी शिल्पकलेंतील पुराव्यांचा दुजोरा मिळण्यासारखा आहे. आरंभीं दीपावलीला प्राचीन नांव यक्षरात्रि किंवा सुखरात्रि असें होतें असा उल्लेख प्रथम वर आलेलाच आहे. त्यालाच आणखी एक नांव सुखसुप्तिका असें असावें असें दिसतें. कारण हेमाद्रि (१३व्या शतकांतील) यानें आपल्या चतुर्वर्गचिंतामणींत आदित्यपुराणाचा हवाला देऊन सुखसुप्तिका नांवाच्या व्रताचें सविस्तर वर्णन केलें आहे. या वर्णनांत आलेल्या कार्तिकमासांतील लक्ष्मीपूजन, दीपवृक्षदान, दीपमाला वगैरे गोष्टींवरून ही सुखसुप्तिका म्हणजे सुखरात्रि म्हणजे यक्षरात्रि म्हणजेच दीपावली होय याबद्दल खात्री पटते. या सुखसुप्तिकावर्णनांत द्यूतक्रीडेचा उल्लेख असून त्याला शंकरपार्वतींचा आधार देऊन महत्त्व दिलें आहे. कार्तिक शुक्ल प्रतिपदेच्या रात्रीं शंकरपार्वतीबरोबर द्यूत खेळत असतांना शंकरांचा द्यूतांत पराजय झाला व पार्वती विजय मिळाल्यामुळें आनंदित झाली. या दिवशीं द्यूतांत जो जिंकील तो वर्षभर सर्वत्र विजयी होईल, असें सुखसुप्तिकाग्रंथांत वर्णन आहे. आतां विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे ही कीं, ही शंकरपार्वतींची द्यूतक्रीडा वेरूळ येथील लेण्यांतून शिल्पानें अंकित केली आहे. शंकरपार्वती द्यूत खेळत आहेत, शंकरानें आपलें एक बोट पुढें केलें असून पार्वतीला ते आणखी एक डाव खेळण्यास सांगत आहेत, पार्वती आपल्या हातानें "खेळ संपला, तुम्ही हरलांत, आतां मी नाहीं खेळत" असें सुचवीत आहे, तरीपण शंकर तिचा एक हातानें पदर ओढीत दुसऱ्या हातानें फासे खेळतच आहेत, दासी दोघांना वारा घालीत आहेत, असे नाट्यपूर्ण देखावे दगडांतील खोदकामांत शिल्पकारानें अप्रतिम कौशल्यानें दाखविले आहेत. हीं शिल्पमय दृश्यें पाहून दिवाळीच्या दिवसांतील लोकप्रिय अशी द्यूतक्रीडादृश्येंच चित्रित झालीं असावींत असें वाटल्याशिवाय रहात नाहीं.

वरील सुमारें दोन हजार वर्षांच्या दिवाळीच्या इतिहासाच्या समालोचनावरून दिवाळीच्या प्रकाशानें भारताचा इतिहास–अगदीं त्या इतिहासाचीं प्राचीन अंतर्गृहें–कशीं उजळून निघालीं आहेत हें दिसून येईल. वरील इतिहासावरून दिवाळीनें व्यापिलेला केवळ कालविस्तारच प्रचंड नव्हे, तर स्थलविस्तार देखील

---

१ Encyclopaedia of Religion and Ethics मधील Siamese Festivals and Fasts वरील G. E. Gerini यांचा लेख पहा.









किती अखिलभारतव्यापी असा आहे, हेंही लक्षांत येईल. दिवाळीला त्यामुळें अखिल राष्ट्राचा उत्सव असें म्हणतां येईल. दिवाळीचें अतिप्राचीन नांव जें 'यक्षरात्रि' त्या यक्षरात्रीला प्राचीन ग्रंथकारांनीं 'माहिमनी क्रीडा' 'अत्यंत मोठा उत्सव' असें जें म्हटलें त्याची सार्थता पटेल.

## दीपावलीच्या उत्पत्तीची उपपत्ति

वर दिवाळीच्या उल्लेखांचा कालक्रमानें सुमारें २००० वर्षांचा केवळ इतिहास दिला आहे. दीपावली या सणाची मूळ मध्यवर्ती कल्पना काय असावी, त्याच्या उत्पत्तीची उपपत्ति कशी बसवितां येईल, त्या सणांत गेलीं दोन हजार वर्षे ज्या निरनिराळ्या देवतांच्या कथांचें, निरनिराळ्या आचारविचारांचें, रूढींचें जाळें विणलें गेलें आहे, त्यांतील निरनिराळे धागे कोणते, ते एकानंतर एक असे केव्हां आले असावे, वगैरे गोष्टींचा खल मनोरंजक असून स्वतंत्र संशोधनाचा विषय होऊं शकेल. त्यावाबत आपले विचार एका स्वतंत्र लेखांत मांडण्याचा लेखकाचा मानस आहे. येथें केवळ थोडेंसें त्यावावत दिग्दर्शन करणें उचित होईल.

वर्षर्तु संपून शरदृतूचें आगमन, शेतकऱ्यांच्या हातांत येणारी धान्य व धनसंपत्ति, सृष्टीचें प्रसन्न व सुंदर स्वरूप, राजे व व्यापारी यांचा उत्साह, वगैरे गोष्टींवरून दीपोत्सव कशा प्रसन्न व अनुकूल वातावरणांत अस्तित्वांत आला असावा याची कल्पना करतां येईल. दीपोत्सवकालीं स्त्रिया रांगोळ्या काढतात. त्या रांगोळ्यांमधून देऊळ, चंद्र, सूर्य, दिव्यांच्या रांगा, कमळें, चक्र, गाईंचीं पावलें, झाडाच्या सावलींत असलेलें धान्याचीं कणसें झोडपायचें मळणीचें खळें, धान्याचे कण टिपून घेणाऱ्या चिमण्या आणि लक्ष्मीचीं पदचिन्हें या गोष्टी चित्रित करतात, त्या अत्यंत अर्थपूर्ण असून त्यांतून दीपावलीच्या मूळ उत्पत्तिवर बराच प्रकाश पडतो. याशिवाय नरकासुरवध, लक्ष्मी-पूजन, बलिराज्य, यमुनेची भाऊबीज वगैरे कथांतून श्रीकृष्णपूजेचा किंवा वैष्णव पंथीयांचा पगडा दिवाळीच्या धार्मिक कल्पनांत स्पष्ट दिसून येतो. जैनांनीं आपल्या धर्माला अनुकूल अशा कथांची सांगड घातली याचा उल्लेख वर आलाच आहे. बंगालमध्यें दुर्गापूजेची छाप या उत्सवावर आहे. असें असूनही या उत्सवांतील धार्मिक कल्पनांवर शैवपंथाचा पगडा असावा असें प्रस्तुत लेखकास वाटतें. दिवाळीचें मूळ नांव यक्षरात्रि ( यक्षाणां तत्र संनिधानात् ), शंकर-पार्वती यांची द्यूतक्रीडा वगैरे उल्लेखांवरून या मतास पुष्टि येते. फार काय दीपावलीच्या समारंभांतून लक्ष्मीपूजेप्रमाणेंच कुबेरपूजाही करीत असत असे उल्लेख सांपडतात. कुबेरपूजा ही शैवपंथाशीं संबद्ध आहे म्हणून दीपावली उत्सवांतील धर्मकल्पना पहिल्यानें शैवपंथीय असाव्या, नंतर वैष्णवपंथाचें जसजसें वर्चस्व होऊं लागलें तसतशा त्यांत वैष्णवपंथीय कल्पना आल्या असाव्यात असें प्रस्तुत लेखकास वाटतें.

---

१ कामसूत्रावरील व्याख्या जयमंगला हिचा कर्ता यशोधर 'महिमा महत्त्वं तद्विद्यते यासांता 'माहिमन्यः' अशी व्युत्पत्ति देतो.

२ श्री. गुप्ते यांचा लेख Indian Antiquary Vol. 32 pp. 237-239 (May 1903)

३ हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणींत वाराहपुराणांतील उल्लेख असून त्यांत कार्तिक शु ॥ १ ला यक्षाची पूजा करावी असें म्हटलें आहे. कृष्णभट्ट आर्डे ( सुमारें १८०० सन ) यांनीं निर्णयसिंधूवरील आपल्या टीकेंत लक्ष्मी-पूजेनंतर कुबेरपूजेचा विधि सांगितला आहे.

"कुबेरपूजापि कार्या । ......तत्र मंत्रः—धनदाय नमस्तुभ्यं निधिपद्माधिपाय च । भवन्तु त्वत्प्रसादान्मे धनधान्यादिसंपदः ॥ "—निर्णयसिंधु चौथी आवृत्ति पान ७१४

# युद्ध जिंकलें, पण स्वास्थ्य गमावलें

प्रा. स. वा. कोगेकर

अलीकडे कांहीं महिने ग्रेटब्रिटन मोठ्या आर्थिक संकटांत सांपडल्याच्या भडक बातम्या चोहीकडे प्रसृत होत आहेत. महायुद्धांत ब्रिटन विजयी झालें पण युद्ध संपून दोन वर्षें होतात न होतात तोंच त्यावर आर्थिक आपत्ति कोसळते व त्याचें कारणही ' युद्धांत ब्रिटननें केलेली कामगिरी ' हेंच सांगितलें जातें, हें पाहून सामान्य माणसास आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं. जर्मनी-जपान-सारख्या शत्रूंवर विजय मिळविल्यानंतरही शेवटीं आर्थिक आधाडीवर अपयशच माथीं यावें ही घटना जरा चमत्कारिक आहे खरी. विशेषतः इंग्लंडचा साथीदार जो अमेरिका त्या देशांत चलती असतांना इंग्लंडमध्यें मात्र दैन्य पसरावें हें कसें ? हा प्रश्नहि सहाजिकपणें विचारला जातो. प्रस्तुत लेखांत ब्रिटनच्या आर्थिक स्थितीचें स्वरूप दिग्दर्शित करण्याचा प्रयत्न केला असून त्यावरून या व अशा प्रश्नांचें उत्तर देणें सोपें जाईल अशी आशा आहे.

## जेत्यासही हालअपेष्टा

प्रथमच ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं अलीकडच्या सर्वंकष युद्धामुळें जित आणि जेते या दोघांवरही हालअपेष्टा भोगण्याची पाळी येते. युद्ध-कालीं तर ती येणारच कारण युद्धाचा निर्णय लागलेला नसतो व तो आपल्या बाजूनें लागावा यासाठीं प्रत्येक युध्यमान राष्ट्राचे प्रयत्न चालू असतात. या प्रयत्नांचा हेतु राष्ट्राच्या मानवी व नैसर्गिक संपत्तीचा अधिकांत अधिक भाग युद्ध-कार्यासाठीं खर्ची टाकावा हा असतो. त्यामुळें समाजाची आर्थिक घडी पूर्णपणें बदलावी लागते. नेहमींचा उद्योगधंदा सोडून ज्याप्रमाणें नागरिकांस आघाडीचा रस्ता धरावा लागतो त्याचप्रमाणें देशाच्या उत्पादनशक्तीचा ओघही युद्धसाहित्य निर्माण करण्याकडे वळवावा लागतो. जीविताची हानि, वित्ताचा नाश आणि दुःखितांचे शिव्याशाप या पूर्वापार युद्धाशीं निगडित केलेल्या घटनांबरोबरच नित्योपयोगी गोष्टींचा तुटवडाहि वरील आर्थिक उलटापालटीमुळें पडतो व त्यामुळें नागरिकांच्या हालांत भरच पडते. बरें, युद्धाचा शेवट झाल्यावर तरी या सर्व आपत्तींतून सहज सुटका होईल म्हणावें, तर तसेंही नाहीं. कारण आधुनिक अर्थव्यवस्था इतकी गुंतागुंतीची झालेली आहे कीं तींत चुटकी-सरसे वाटेल तसे बदल घडवून आणतां येत नाहींत. त्यांस कालावधि लागतो. विजयी राष्ट्रांना जित राष्ट्रांकडून नुकसानभरपाई मिळविण्याची शक्यता असल्यामुळें त्यांची स्थिति तरी यापेक्षां निराळी असेल असें कोणासही वाटेल. परंतु या नुकसानभरपाईलाही मर्यादा आहे आणि ती वसूल करणें देखील कठीण आहे असें पहिल्या महायुद्धाच्या अनुभवानें सिद्ध झालें आहे ! त्यावेळीं जर्मनीवर जबर खंडणी लादण्यांत आली. ती वसूल करणें हप्त्याहप्त्यानेंच शक्य होणार हें स्पष्ट दिसत होतें. हे हप्ते भरण्याची ताकद जर्मनीस प्राप्त होण्यासाठीं तिची उत्पादकशक्ति वाढणें आवश्यक होतें. पण जर्मनींत तयार होणारा माल पश्चिमेकडील राष्ट्रांत तयार होणाऱ्या तसल्याच मालाशीं स्पर्धा करूं लागल्यामुळें जेत्यांच्या अंतर्गत अर्थरचनेस त्यामुळें धोका निर्माण झाला. इतर प्रतिकूल गोष्टींत याही गोष्टीची भर पडल्यामुळें शेवटीं जागतिक मंदीची लाट पसरली

आणि तिच्यामुळें जित आणि जेते दोघेही संकटांत आले. 'भीक नको पण कुत्रा आवर' अशी जेत्याची अवस्था एकदां झाली असल्यामुळें चालू युद्धानंतर लांब मुदतींत पराभूत राष्ट्रांकडून खंडणी वसूल करण्याचा हव्यास कोणत्याच विजयी राष्ट्रानें धरला नाहीं. जी खंडणी वसूल करण्यांत आली, ती उत्पादनांच्या साधनांच्या रूपांत. पण तिलाही मर्यादा घालणें क्रमप्राप्तच होतें. कारण उत्पादनाच्या साधनावर प्रत्येक राष्ट्रांतील क्रयशक्ति ठरत असते. तीं साधनेंच पुष्कळ कमी केलीं तर ही क्रयशक्ति अर्थात् कमी होणार आणि परस्परांवर अवलंबून असलेल्या अर्थव्यवस्थेंत त्याचा दुष्परिणाम व्यापारांत घट येण्यांत दिसून येणार, हें आतां सर्वमान्य झालेलें आहे. तसेंच युद्धापूर्वी जर्मनीसारख्या देशांतील उत्पादनावर युरोपांतील इतर राष्ट्रांचें उत्पादनही कांहीं अशीं अवलंबून होतें. उदाहरणार्थ, रूहर प्रांतांतील कोळसा फ्रान्सच्या औद्योगिक व्यवहारांस आवश्यक होता आणि आजही आहे. त्यामुळें जित राष्ट्रांची कुचंबणा करणें कांहीं एका मर्यादेपुढें शक्य होत नाहीं; तसें केल्यास बूमरँगप्रमाणें जेत्यासही आर्थिक आपत्तीचे प्रहार सहन करावे लागतात. यावरून हें दिसून येईल कीं इंग्लंडच्या आर्थिक संकटांत जित राष्ट्रांकडून नुकसानभरपाईच्या स्वरूपांत वसूल केलेल्या खंडणीचा उपयोग मोठ्या प्रमाणावर मदत म्हणून होईल असें मानणें बरोबर नाहीं. पण त्याचबरोबर युद्धामुळें इंग्लंडचें आर्थिक दृष्ट्या नुकसान झालें ही गोष्ट कांहीं बदलूं शकत नाहीं. हें नुकसान कशाप्रकारचें आणि किती झालें? त्यासाठीं प्रथम आपणास ब्रिटनच्या युद्धपूर्वकालीन परिस्थितीकडे वळलें पाहिजे.

## ब्रिटनच्या आर्थिक व्यवहारांत आयातीचें महत्त्व

युद्धापूर्वी ब्रिटनच्या उपभोग्य राष्ट्रीय उत्पादनाचें प्रमाण सरासरी माणशीं वार्षिक १०० पौंडांचें (१३३० रु. थोडें वर) होतें. त्याच्या जवळ जवळ २० टक्के इतक्या प्रमाणांत आयात होणाऱ्या मालाची किंमत होती; आणि सुमारें १० टक्के निर्यात मालाची किंमत होती. आयात होणाऱ्या मालांत मुख्यतः खाद्यपदार्थ आणि कच्चा माल यांचा भरणा तर निर्यात मालाचें स्वरूप बव्हंशीं कारखान्यांत तयार होणारा माल असें होतें. निर्यात मालाची किंमत आणि आयातीची किंमत यामध्यें असलेला फरक भरून काढण्यास मुख्य तीन साधनें उपलब्ध होतीं. त्यांपैकीं सर्वांत प्रमुख म्हणजे परदेशांत गुंतविलेल्या भांडवलावरील मिळणारा नफा हें होय. त्यानंतर समुद्रमार्गें होणाऱ्या वहातुकींत मिळणारा फायदा आणि शेवटीं बँका, इन्शुअरन्स कंपन्या वगैरे ब्रिटिश धंद्यांवर परदेशांत होणारा फायदा असा क्रमांक लागतो. शिवाय लंडन ही सर्व जगाची एक प्रमुख पेढी असल्यामुळें कोठल्याही देशाचें चलन अगदीं कमी व्याजानें तात्पुरत्या गरजा भागविण्यासाठीं मिळणें सहज शक्य असे. परदेशांत एकंदर ४०० कोटी पौंड ( सुमारें ५३३० कोटी रुपये ) भांडवल गुंतविलेलें असून त्यावर दरसाल २० कोटी पौंडांच्यावर फायदा ब्रिटनला होत असे.

आयात मालांत मुख्यतः खाद्यपदार्थ व कच्चा माल यांचा समावेश होतो, असें वर म्हटलें आहे. त्यावरून आयातीला ब्रिटनच्या आर्थिक व्यवहारांत किती महत्त्व आहे हें समजूं शकेल. कारखान्यांस जरूर असणारा कच्चा माल जर परदेशांतून मिळूं शकला नाहीं, तर इंग्लंडमधील उद्योगधंदे बंद पडतील. ते बंद पडल्यास देशांत बेकारी माजेल एवढेंच नव्हे तर लोकांना लागणारे खाद्यपदार्थ मिळविणें देखील मुष्किल होईल. कारण हे खाद्यपदार्थही बाहेरूनच येतात आणि त्यांची किंमत तयार मालाची निर्यात करूनच ब्रिटनला द्यावी लागते. निर्यातीपैकीं शेंकडा ७० टक्क्यांहून अधिक माल कारखान्यांत तयार झालेला असल्यामुळें कारखाने बंद पडल्यास अगर त्यांचें उत्पादन घटल्यास इतर मार्गांनीं ती तूट भरून काढण्याची शक्यता ब्रिटनला नाहीं. जगांतील औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या राष्ट्रांत इतर कोठल्याही राष्ट्रांपेक्षां ब्रिटनला परदेशी व्यापाराचें महत्व सर्वांत अधिक कां होतें हें यावरून ध्यानांत येईल. अमेरिकेसारख्या देशांत अंतर्गतच नैसर्गिक साधनसामुग्रीची इतकी सुबत्ता आहे कीं परदेशी व्यापारावांचून तो देश अन्नान्न दशेला जाईल असें म्हणतां येत नाहीं. ब्रिटनची बरोबर उलट स्थिति आहे. जगभर पसरलेल्या

व्यापारी पेठांशीं आपलें दळणवळण अव्याहत सुरू रहावें यावर ब्रिटिश जनतेचा असलेला कटाक्षही याच कारणामुळें होय. समुद्रावरील स्वामित्व टिकवून आपल्या "जीवनमार्गा"चें (Life-lines) रक्षण करण्याची तीव्र जबाबदारी ब्रिटिश सरकारला याचसाठीं वाटत असते.

## ब्रि. अर्थव्यवस्थेवर युद्धकालीं पडलेला ताण

युद्धांत ब्रिटिश अर्थव्यवस्था पूर्णपणें बदलली. निर्यातीसाठीं माल काढणाऱ्या कारखान्यांत युद्धोपयोगी माल निघूं लागला, जहाजांचा उपयोग मोठ्या प्रमाणावर युद्धकार्यातील वहातुकीसाठीं करावा लागला, सैन्यांत लाखों लोकांना नोंदवून घेतल्यामुळें कामगारांच्या संख्येंतही तुटवडा पडला. त्यांतच शत्रूच्या हल्ल्यांमुळें घरेंदारें, कारखानें, आगबोटी इत्यादींचा मोठ्या प्रमाणावर विध्वंस झाला. ज्या वस्तू परदेशांना विकून त्यांच्या बदलीं कच्चा माल व खाद्यपदार्थ मिळावयाचे त्या वस्तूंत तूट आली आणि तिची भरपाई करण्यासाठीं सरकारला आपल्या सुवर्णाच्या आणि इतर देशांच्या चलनाच्या पुंजीवर प्रथम गदा आणावी लागली. परंतु युद्ध जसें लांबलें तसतशी या पुंजीवर गुजराण करीत रहाण्याची शक्यता कमी कमी होऊं लागली, आणि कांहीं कालानें ती पुंजी संपून भांडवल निकालांत काढण्याची जरूरी उत्पन्न झाली. त्याचप्रमाणें युद्धकालांत आपल्या देशांतील भांडवलापैकीं जवळ जवळ निम्में भांडवल ब्रिटनला गमवावें लागलें. पण तेवढ्यानेंही भागलें नाहीं म्हणून आपल्या राजकीय सामर्थ्याच्या जोरावर ब्रिटननें मोठ्या प्रमाणांत उधारीनें माल विकत घेतला. ही उधारी युद्धाच्या शेवटीं जवळ जवळ ४५० कोटी पौंडांपर्यंत चढली होती. हिंदुस्थानकडून अशा रीतीनें सर्वांत जास्त म्हणजे सुमारें १२० कोटी पौंडांचा (१६०० कोटी रुपयांचा) माल ब्रिटननें मिळविला! तरी अमेरिकेनें आपल्या उधार-उसनवार पद्धतीनें दिलेल्या मदतीमुळें ब्रिटनची बाजू बरीच सावरली. युद्धकालांत अमेरिकेनें या प्रकारें ब्रिटनला दिलेल्या मदतीचा अंदाज सुमारें ५०० कोटी पौंड (६३०० कोटी रुपये) करण्यांत आला आहे. ब्रिटनचा १९४५ अखेरपर्यंतचा युद्धखर्च एकूण २९५५ कोटी पौंड (जवळ जवळ ४०,००० कोटी रुपये) झाला, त्यापैकीं ४६ टक्के खर्च करांच्या रूपानें ब्रिटिश जनतेकडून वसूल करण्यांत आला. राहिलेला सर्व खर्च अंतर्गत कर्जें, बाहेरील भांडवल आणि उधारी या मार्गांनें भागविण्यांत आला. या सर्व आंकड्यांवरून ब्रिटिश अर्थव्यवस्थेवर युद्धकालीं पडलेल्या ताणाची कल्पना येईल.

युद्धाचा शेवट होतांच अमेरिकेकडून उधार-उसनवारीनें जवळ जवळ देणगीवजा मिळणारी मदत एकदम बंद झाली. या मदतीचा उपयोग मुख्यतः खाद्यपदार्थ मिळविण्यासाठीं होत असे. त्यामुळें तिच्या तहकुबीनें ब्रिटिश जनतेला मोठा धक्काच बसला. युद्धकालांत परदेशी व्यापार पूर्णपणें विस्कळित झाला होता. त्यामुळें इतक्या झटपट पूर्ववत् आयातीची किंमत देणें अशक्य होतें. परदेशाकडून मिळणाऱ्या भांडवलावरील नफ्यांत घट झालेली; उलट इतर देशांचें मोठें कर्ज अंगावर पडलेलें; वहातुकीच्या साधनांत जहाजांच्या विनाशामुळें जवळ जवळ ३० टक्के घट झालेली; अंतर्गत उत्पादन नागरी जीवनास उपयुक्त करण्यास लागणारा अवधि; लाखों लोक अनुत्पादकरीत्या सैन्यांत अडकून पडलेलें; जर्मनी, इटली वगैरेंच्या व्यवस्थेची अंशतः जबाबदारी अंगावर घेतल्यामुळें होणारा खर्च;—या सर्व कारणांमुळें जीवनास आवश्यक असणाऱ्या मालाची आयात करणें ब्रिटिश सरकारला अशक्य वाटत होतें. या कठिण परिस्थितींतून मार्ग काढण्यासाठीं शेवटीं अमेरिकेकडे मदतीची याचना करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. आणि त्याप्रमाणें १९४५ च्या डिसेंबरांत अमेरिकेकडून एक मोठें कर्ज मिळण्याची सिद्धता झाली. कर्जाची रक्कम एकंदर ४४० कोटी डॉलर असून त्यापैकीं ६५ कोटी डॉलर उधार-उनसवारींत आगलेल्या मालाची बिलें पूर्ण करण्यासाठीं व राहिलेले ३७५ कोटी डॉलर ब्रिटनची अंतर्गत अर्थरचना सुधारण्यासाठीं उपयोगांत आणावयाचे होते. या कर्जास अमेरिकन विधिमंडळाची संमति जुलै १९४६ त मिळाली.

कर्जाचा उपयोग ब्रिटनची युद्धाभिमुख अर्थव्यवस्था पुन्हां एकदां शांतता-कालास अनुरूप करण्यासाठीं लागणाऱ्या कालांत जरूर असणाऱ्या












नित्योपयोगी व भांडवली गोष्टी विकत घेण्यासाठी करावयाचा होता. या कार्यास सरासरी ५ वर्षे लागतील असें समजून कर्जाची रक्कम वाटेल त्याप्रमाणें हप्त्याहप्त्यानें ५ वर्षेपर्यंत मिळण्याची सोय करण्यांत आली होती. कर्जाच्या व्याजासंबंधीं आणि परतफेडीबद्दल बरीच घासाघीस करून शेवटीं असें ठरलें कीं ५ वर्षांनंतर म्हणजे १९५१ पासून पुढील ५० वर्षेपर्यंत व्याज व मुद्दलाची परतफेड यासाठीं दरसाल ब्रिटननें अमेरिकेला सरासरी १४ कोटी डॉलर ( ३॥ कोटी पौंड ) द्यावेत. व्याज शें. २ टक्के दरानें आकारण्यांत आलें होतें.

## अमेरिकेनें लादलेल्या अटी

पण येवढ्यानेंच ब्रिटनची जबाबदारी संपणार नव्हती. कर्जाच्या परतफेडीबरोबरच इतरही कांहीं महत्त्वाच्या मुद्यांबद्दल ब्रिटनवर अमेरिकेनें बंधनें लादलीं आणि अगतिक झाल्यामुळें ब्रिटननें तीं मान्यही केलीं. पण त्यामुळें ब्रिटिश अर्थव्यवस्थेवर अधिकच ताण पडणार याची खात्री असल्यामुळें अमेरिकेच्या निर्घृण सावकारी धोरणाबद्दल ब्रिटनमध्यें कडक टीका करण्यांत आली. " इकॉनामिस्ट " या सुप्रसिद्ध ब्रिटिश अर्थविषयक साप्ताहिकानें तर अमेरिकन सावकारी धोरणाचा अत्यंत जळफळाटानें निषेध करून तिच्या लोभाबद्दल ती शापित ठरावी असेंही म्हटलें ! ज्या अटीमुळें इतका संताप निर्माण केला, त्या अटींत मुख्यतः दोन गोष्टींचा समावेश करण्यांत आला होता. पहिली अशी कीं, कर्जास अखेरची मान्यता मिळाल्यापासून एक वर्षानंतर ब्रिटिश चलनाचें रूपांतर इतर कोठल्याही चलनांत करण्यावर बंदी असूं नये. आणि दुसरी म्हणजे ब्रिटिश सरकारनें इतर कोणत्याही एका देशास व्यापाराच्या बाबतींत विशिष्ट सवलती देऊं नयेत. अथवा असा कोणताहि करार करूं नये कीं, ज्यामुळें अशा तऱ्हेच्या सवलती विशिष्ट देशासच मिळूं शकतील.

## त्या अटींचे परिणाम

पहिल्या अटीचा अर्थ असा होता कीं १५ जुलै १९४७ नंतर ब्रिटनला माल पुरवून त्या बदलीं मिळालेल्या पौण्डांच्या बदलीं इतर कोणतेंही चलन मागण्याचा अधिकार माल विकणाऱ्या देशाला देण्यांत यावा. चालू व्यापारांत मिळविलेल्या पौण्डांचें रूपांतर युद्धकालांत स्टर्लिंग गटांत सामील झालेल्या इतर देशांच्या चलनाशिवाय अन्य चलनांत करण्यावर कांहीं निर्बंध लादण्यांत आले होते. त्यांचा उद्देश युद्धासाठीं लागणाऱ्या वस्तू खरेदी करण्यासाठीं जास्तींत जास्त परदेशी चलन उपलब्ध असावें हा होता. परंतु वरील अटीमुळें ही बंदी उठविण्याची आवश्यकता होती. त्याचा परिणाम असा होणार होता कीं ब्रिटनला पाठविलेल्या मालाच्या बदलीं अमेरिकन डॉलरची मागणी धनकोकडून केली जाऊन तेवढे डॉलर उभे करण्याची जबाबदारी ब्रिटनवर पडणार होती. माल मिळण्याचें ठिकाण सध्यां तरी अमेरिका हेंच असल्यामुळें आणि तेथील व्यवहार डॉलरमध्यें होत असल्यानें हरतऱ्हेच्या मालाची खरेदी करण्यासाठीं डॉलर मिळविण्याची धडपड सर्वत्र चालू आहे. पण हे डॉलर मिळवावयाचे म्हणजे (१) अमेरिकेला आपला माल विकावयाचा, (२) अमेरिकेंतील आपल्या ठेवींचा उपयोग करावयाचा, (३) सुवर्णाचा उपयोग करावयाचा, (४) अमेरिकेंतील आपलें भांडवल निकालांत काढावयाचें, किंवा (५) ज्यापाशीं डॉलर आहेत अथवा जो डॉलर देऊं शकेल अशा देशाला आपला माल विकावयाचा येवढेच मार्ग मोकळे आहेत. यापेक्षां निराळा असा एकच मार्ग म्हणजे अमेरिकेकडून कर्ज मिळविणें, आणि त्याचा अवलंब इतर मार्गांच्या अभावीं ब्रिटननें केला होता. परंतु इतर देशांतून माल मिळविण्याची आवश्यकताही ब्रिटनला असल्यामुळें त्या मालाच्या बदलींत देखील डॉलरच द्यावे लागल्यास कर्जाचा उपयोग अंतर्गत पुनर्रचनेसाठीं न करतां दैनंदिन गरजांसाठींच मुख्यतः करावा लागेल अशी भीति ब्रिटिश सरकारला वाटत होती. आणि ती प्रत्यक्ष घडामोडींतही खरी ठरली. कारण १५ जुलै १९४७ नंतर ब्रिटनजवळच्या डॉलरला फारच मोठ्या प्रमाणांत ओहोटी लागली आणि त्याचा परिणाम असा झाला कीं, जें कर्ज ३।४ वर्षेतरी पुरेल असें वाटलें होतें तें १६ महिन्यांतच संपून गेलें! दुसरीही एक गोष्ट डॉलरच्या ओहोटीला कारणीभूत







झाली. ती म्हणजे अमेरिकेंतील वाढत्या किंमती. कर्ज काढल्यापासून नंतरच्या कालांत या किंमती सारख्या चढूं लागल्या आणि आज ३० ते ४० टक्क्यांनीं त्या वाढलेल्या आहेत. त्यामुळें तोच माल घेण्यासाठीं आज पूर्वींपेक्षां ३० ते ४० टक्के अधिक डॉलर मोजावे लागतात.

ही अट लादण्यामागें अमेरिकेचा डाव असा होता कीं यायोगें स्टर्लिंग गटांतील मुलुखांत आपला व्यापार वाढून युद्धकालीं वाढलेल्या उत्पादन-शक्तीस वाव मिळवितां येईल. पौंडाचें डॉलरमध्यें रूपांतर करण्यावरील बंदी जरी चालूं ठेवली असती, तर त्या जोरावर या भागांत ब्रिटिश मालाला एक प्रकारचें संरक्षित गिऱ्हाइक मिळालें असतें व अमेरिकेच्या मालाचा प्रसार त्या मानानें कमी झाला असता. अर्थात् ब्रिटनलाही फार काळ ही बंदी चालू ठेवतां आली नसती हें खरें. कारण तसें करण्यानें ब्रिटनचें जगांतील पैशाच्या बाजारांत जें स्थान आहे, त्याला धोका उत्पन्न झाला असता. परंतु आर्थिक संक्रमणाच्या कालीं ही बंदी या ना त्या स्वरूपांत चालूं ठेवणें केव्हांही ब्रिटनच्या हिताचें होतें.

दुसरी अट जास्तच अडचणीची होती आणि तिच्याविरुद्ध सर्वांत जास्त गहजब करण्यांत आला. त्याचें कारण असें कीं, जगाच्या व्यापारांतील आपलें महत्त्वाचें स्थान लक्षांत घेऊन युद्धापूर्वीच्या काळीं ब्रिटननें निरनिराळ्या देशांशीं परस्पर साहाय्याचे आर्थिक व व्यापारी करार केले होते. उदाहरणार्थ, अर्जेंटाईनला गहूं विकत घेणाऱ्या गिऱ्हाइकाची अत्यंत जरूर आहे आणि ब्रिटनला कोणाकडूनही गहूं घेणें प्राप्त आहे, परंतु अमुकच देशांकडून घेतला पाहिजे अशी सक्ति नाहीं. या स्थितीचा फायदा घेऊन अर्जेंटाईनचा गहूं खरीदण्याची तयारी दर्शविल्यास अर्जेंटाईनवर ब्रिटनकडून विशिष्ट तऱ्हेचा माल घेतला पाहिजे, अशा प्रकारचें दडपण आणणें शक्य आहे. त्यासाठीं या दोन देशांत व्यापारी करार झाला तर परस्परांना मदत होईल. पण त्याचबरोबर हाच माल विकणाऱ्या इतर देशांना या दोन देशांत आपला व्यापार करण्याची संधि मिळूं शकत नाहीं. ब्रिटिश मालाशीं स्पर्धा करणाऱ्या अमेरिकन मालाचें अर्जेंटाईनमधील गिऱ्हाईक या करारानें खास कमी होणार. अशा तऱ्हेचे करार करून ब्रिटन आपल्या मालाला हमखास गिऱ्हाईक मिळवूं पहात असे. पण या अटीमुळें तो मार्ग बंद होणार होता. त्याचाच अर्थ असा कीं, चढाओढीच्या तत्त्वावर व्यापार करण्यास सर्वांना मोकळीक असावी, असें अमेरिकेचें म्हणणें ब्रिटनला मान्य करावें लागलें. पण कित्येक प्रकारच्या मालाच्या निर्मितींत अमेरिका ब्रिटनपेक्षां पुढें गेलेली असल्यामुळें ही चढाओढ करणें ब्रिटनला आज शक्य नाहीं. त्याऐवजीं दुसऱ्या देशाचें मोठें गिऱ्हाईक म्हणून मिळणाऱ्या मोठेपणाचा उपयोग ब्रिटन करीत असे, तेंही यापुढें करतां येणार नाहीं. त्यामुळें जरूर असणारी आयात करण्याची ब्रिटनची शक्ति खची झालेली आहे, असें मत प्रदर्शित केलें जातें.

## राहाणीचें वाढतें मान

पण ही झाली यापुढील कांहीं कालानंतरची अडचण. आज सर्व तऱ्हेच्या मालाला भरपूर गिऱ्हाईक असल्यामुळें माल कसा खपेल ही विवंचना नाहीं. मागणी कशी पुरवावी हा मोठा प्रश्न आहे. त्यामुळें आयातीच्या बदलीं निर्यात करणें कठीण नाहीं. पण ब्रिटनला त्याही बाबतींत अडचण वाटत आहे. त्याचें कारण उत्पादन जितकें अधिक व्हावयास पाहिजे, तितकें तें होत नाहीं. युद्धपूर्वकालाशीं तुलना करतां आज शें. १० ते २० टक्के उत्पादनांत वाढ झालेली आहे; असा अंदाज करण्यांत आलेला आहे. पण त्याउलट प्रत्यक्ष नित्योपयोगी वस्तूंची आयात, परदेशांत ठेवलेल्या सैन्यांचा खर्च आणि सरकारखातीं इतरत्र खर्च होणारी रक्कम यांसाठीं लागणारी किंमत पूर्वींपेक्षां पुष्कळच वाढलेली आहे. त्याशिवाय एकंदर उत्पादनापैकीं पूर्वींहून अधिक भाग अंतर्गत उपयोगासाठींच लागतो, असेंही दिसून आलें आहे. याचें कारण युद्धानंतर शिक्षण, आरोग्य, घरबांधणी, आहार इत्यादि सामाजिक सुधारणांसाठीं पूर्वींपेक्षां कितीतरी अधिक खर्च करण्यांत येत आहे. १९४६ सालीं नागरी आहाराचें प्रमाण १९३८ सालच्या म्हणजे युद्धपूर्वकालच्या इतकेंच होतें असें दाखवून देण्यांत आलें आहे. म्हणजे आज जी








ब्रिटनच्या आयात-निर्यातींत तफावत दिसून येते, तिचें एक प्रमुख कारण ब्रिटिश जनतेच्या वाढत्या रहाणीच्या मानांत सांपडेल, असें "इकॉनमिस्ट" सारख्या अधिकारी साप्ताहिकावरून आढळतें. ब्रिटनची अंतर्गत पुनर्रचना पूर्ण होण्यापूर्वी सध्यांहून अधिक प्रमाणांत उत्पादन करणें अशक्य झालें आहे. याचसाठीं उत्पादनांत वाढ करण्याची कोशीस करण्यांत येत आहे. त्यासाठीं सरकारला अर्थव्यवस्थेवर हवा असणारा संपूर्ण ताबा अजून मिळालेला नाहीं. राष्ट्रीयकरणाच्या योजनांचा तोच उद्देश आहे. पण त्या पूर्णत्वास येण्यापूर्वीच ऑगस्टमध्यें डॉलर पुंजीवर मोठा ताण पडून आर्थिक परिस्थिति गंभीर झाली, आणि तिच्या दडपणाखालीं उत्पादनाचीं साधनें हातीं असणाऱ्या मालकवर्गापुढें सरकार मान तुकविणार अशी दाट शंका येऊं लागली. त्यामुळेंच पार्लमेंटांतील मजूर पक्षाच्या तरुण मंडळींनीं सरकारविरुद्ध बंड पुकारून त्यांस सर्व परिस्थितीचा फेरविचार करण्यास भाग पाडलें.

## तूट भागविण्याचे अनेक मार्ग

ऑगस्टमध्यें असें दिसून आलें कीं, ब्रिटनचें परराष्ट्रांस देणें व परराष्ट्रांकडून येणें यांमध्यें दरसाल ७० कोटी पौंडांच्या दरानें तूट पडणार, तितक्या किंमतीचे डॉलर ब्रिटनकडून इतरांना देणें राहणार. हें देणें भागविण्याचे अनेक मार्ग होते. एक म्हणजे आयात कमी करून देण्याची जरूरीच नाहींशी करणें. पण हा मार्ग विशिष्ट मर्यादेपुढें आचरणें कसें शक्य नाहीं हें सुरुवातीस दाखविलें आहे. फार तर चैनीच्या वस्तूंची आयात बंद करणें शक्य होईल. पण आवश्यक खाद्यवस्तू आणि कच्चा माल यांचा पुरवठा सतत केलाच पाहिजे. आणि वार्षिक २० कोटींपेक्षां अधिक रकमेपर्यंत ही आयात कमी करणें शक्य नाहीं असा यापुढील दोन वर्षांनंतरचा अंदाज करण्यांत आला आहे. तात्पुरती योजना म्हणून तंबाखू व चित्रपट यांच्या आयातीवर जबर जकात बसवून नियंत्रण घालण्यांत आलें आहे. दुसरा मार्ग, आयातींत कपात न करतां निर्यातींत वाढ करून तूट भरून काढणें. पण त्या मार्गांत दोन अडचणी आहेत. एक तर युद्धकाळीं झालेलें सर्व नुकसान अजून भरून निघालें नसल्यामुळें उत्पादनाच्या साधनांची कार्यक्षमता पुरेशी नाहीं. आणि दुसरें म्हणजे, अजूनही १० लक्षांहून अधिक नागरिक सैन्यांत गुंतले असल्यामुळें काम करावयास माणसांचा पडलेला तुटवडा. हीं माणसें परत नागरी जीवनांत आणावयाचीं म्हणजे सरकारच्या परराष्ट्रीय धोरणांत बदल केला पाहिजे; कारण शांततेकालांत लागणाऱ्या सैनिकांची संख्या परराष्ट्रीय धोरणावर अवलंबून असते. आज रशियाविरोधी भूमिकेमुळें ठिकठिकाणचे हितसंबंध सुरक्षित राखण्यासाठीं ब्रिटिश सैन्याचा उपयोग केला जातो. रशियाशीं मैत्री करून ही जरूरी कमी करावी असें मजूरपक्षांतील बंडखोरांचें मागणें आहे. त्यामुळें दुहेरी फायदा होईल. एक तर सध्यां नाहक होणारा खर्च वांचेल, आणि दुसरें म्हणजे सैन्यांत अडकून पडलेल्या नागरिकांचा उत्पादनवाढीस उपयोग होईल. तसेंच जर्मनीच्या व्यवस्थेचा भार अंगावर घेतल्यामुळें देखील जो जादा खर्च पडतो, तो तेथील कारभार जर्मन लोकांचे हातीं सोंपवून कमी करावा, अशीहि एक सूचना आहे. तिसरा मार्ग, सामाजिक सुधारणांचा वेग कमी करण्यांत येऊन अंतर्गत उत्पादनापैकीं कांहीं भाग निर्यातीला मोकळा करावा. ही सूचना मुख्यतः मालकवर्गाकडून पुढें आली आहे. विशेषतः खाद्यवस्तू योग्य प्रमाणांत विकत घेतां याव्या म्हणून सरकारतर्फे कमी उत्पन्न असणाऱ्या लोकांना देण्यांत यावयाच्या भत्त्यांत कपात करण्यांत यावी किंवा तो भत्ता अजिबात बंद करण्यांत यावा अशीहि मागणी करण्यांत आली आहे. तसेंच घरें बांधणें, म्हातारपणाचें पेन्शन, मुलांसाठीं भत्ते इत्यादि सामाजिक सुरक्षिततेच्या योजनाही आवरत्या घ्याव्या, असें सांगण्यांत येतें. असें केल्यास आयातीवरील ताण कमी होईल, निर्यात वाढूं शकेल आणि दोहोंमधील तफावत कमी होईल असा युक्तिवाद करण्यांत येत आहे. परंतु असें करण्यामागील मुख्य हेतु सरकारच्या राष्ट्रीयकरणाच्या योजनांवर पाणी पाडणें हाच आहे. कारण अधिक उत्पादनाची निकड आज रहाणीचें मान वाढविण्यासाठींच मुख्यतः उत्पन्न झालेली आहे. तें वाढविणें म्हणजे श्रमजीवि जनतेस उत्पादनापैकीं वाढता भाग देणें होय. तसें करणें खाजगी मालमत्तेच्या मामल्यांत शक्य नसल्यानें








राष्ट्रीयकरणाकडे लक्ष वळलें. व तें तर होऊं नये असें समाजांतील मालकवर्गास वाटत आहे. त्यामुळें आर्थिक संकटाचा फायदा घेऊन सर्व आपत्तींचें मूळ मजूर सरकारच्या राष्ट्रीयकरणाच्या योजनेशीं जोडण्याचा प्रयत्न जोरांत चालू आहे. परंतु अजून तरी सरकारनें या बाबतींत आपली भूमिका बदलल्याचें जाहीर केलेलें नाहीं.

## रहाणीचें मान टिकवून धरण्याचा प्रयत्न

सरकारकडून सध्यां आयात-नियंत्रण, कामाच्या तासांत वाढ व निर्यातींत वाढ याच मार्गांवर मुख्य जोर देण्यांत येत आहे. अमेरिकेनें लादलेल्या अटींपैकीं स्टार्लिंग रूपांतर करण्याच्या अटींवर सवलत मिळविण्यांत आली असून २१ ऑगस्टपासून हे रूपांतर स्थगित करण्यांत आलें आहे. व्यापारविषयक करारांसंबंधींच्या अटींवर पुनः बोलणीं सुरू करण्यांत आलीं आहेत. आणि मार्शल योजनेखालीं पुनर्घटनेसाठीं दुसरें अमेरिकन कर्ज मिळविण्याची तयारीहि चालू आहेच. सध्यां मात्र अमेरिकेकडून ब्रिटनला कांहीं तात्पुरती मदत मिळेल, असें दिसत नाहीं. नुकतीच युरोपला अशा तऱ्हेचें एक कर्ज देण्यासंबंधींची योजना प्रे. ट्रुमन यांनीं विचारासाठीं घेतली आहे. पण त्यांत ब्रिटनचा समावेश करण्यांत आलेला नाहीं. आपल्याजवळ असलेल्या सुवर्णाच्या सांठ्यापैकीं २ कोटी पौंड किंमतीचें सोनें विकून व आणखी ६ कोटी पौंडांचें कर्ज आंतरराष्ट्रीय चलननिधींतून काढून ब्रिटननें तात्पुरती तोंडमिळवणी केलेली आहे. व या रीतीनें मिळणारी सर्व रक्कम संपेपर्यंत अमेरिका निराळी मदत देणार नाहीं असें बोललें जात आहे. परदेशी भांडवलापैकीं अजूनही सुमारें २०० कोटी पौंडांचें भांडवल ब्रिटनजवळ शिल्लक आहे याची दखलही अमेरिकन सरकारनें घेतलेली आहे असें दिसतें. अर्थात् या उलट सुमारें ३०० कोटी पौंडांचीं इतर देशांचीं कर्जेंही ब्रिटनला झालेलीं आहेत ही गोष्ट ब्रिटिश सरकारतर्फे पुढें येतेच. पण हीं कर्जें ' स्टार्लिंग शिलकीच्या ' स्वरूपांत असून ती शिल्लक कधीं हातीं येईल याची धनको देशांना मुळींच खात्री नाहीं !

या सर्व विवेचनावरून असें दिसून येईल कीं ब्रिटनची आजची आर्थिक अडचण ही बऱ्याच अंशीं रहाणीचें मान टिकवून धरण्याच्या प्रयत्नामुळें निर्माण झालेली आहे. रहाणीचें मान कमी केल्यानें आंतरराष्ट्रीय देण्याघेण्यांतील तूट कमी करतां येईल, तशीच उत्पादनवाढ केल्यानेंही ती कमी करतां येईल. जनतेचें सरकार म्हणून मजूर सरकारचा प्रयत्न दुसऱ्या मार्गानें चालू आहे. पण त्या मार्गानें प्रगति होण्यासाठीं सरकारचा अर्थव्यवस्थेवरील ताबा अधिक बळकट करावा लागेल, ही जाणीव असल्यानें व त्यामुळें वैयक्तिक हितास बाध येणार असल्यानें खासगी उत्पादकांची ओरड सुरू असून " उत्पन्नापेक्षां अधिक खर्च " करणाऱ्या सरकारचा निषेध करण्यांत येत आहे. उलट रहाणीच्या मानाला हात लावण्यापेक्षां सरकारच्या धोरणामुळें राष्ट्रावर पडणाऱ्या बोजांत कपात करावी व त्यासाठीं सरकारी धोरण योग्य दिशेनें बदलावें अशी मागणी तरुण समाजवादी पुढारी करीत आहेत. या दोहोंत अधिक सामर्थ्य कोणाचें आहे तें लवकरच दिसून येईल.










# दोघींच्या मध्यें नाचणाऱ्या तिसऱ्याच कलावतीचें नृत्य

रोहिणी भाटे

पुष्कळदां मला असा अनुभव आलेला आहे कीं नृत्य-कारांच्या निरनिराळ्या 'आसनांतील' (Sitting pose) वा 'करणांतील' (Standing pose) चित्रांकडे अत्यन्त एकाग्रतेनें पहात राहिलें असतां, त्या पोज (pose) नंतर तो वा ती कशा तऱ्हेची हालचाल, हस्ताविर्भाव करतील, त्याला अनुसरून, त्यांच्या चेहऱ्यावरील स्नायूंच्या हालचालींत नैसर्गिक-रीत्या कोणते फेरबदल होतील, कोणचे भाव त्याच-वेळीं त्या फेरबदलांतून प्रथम अस्पष्टसे दिसून नंतर ठळकपणें दृग्गोचर होऊं लागतील या साऱ्याची मनोमय कल्पना, या साऱ्याचें एक पुसटतें रेखाचित्र माझ्या मनापुढें उभें राहतें.

## अंतश्चक्षूसमोरील दृश्य

मानवी छायाचित्राची गोष्ट सोडली तरी अजंठा, वेरूळ अगर इतर ठिकाणच्या प्रसिद्ध दगडी कोरीव मूर्तींचीं चित्रें पाहिलीं,तरीसुद्धां जराश्या एकाग्र दृष्टीच्या धारेमुळें त्या दगडी शरीरांतील एक चेतनावंत सूक्ष्म शरीर त्या पोजच्या पुढच्या पोजची किंवा नृत्यकृतींची सूचना—अस्पष्ट, मनावर न ठसणारी परंतु मनाला जाणवणारी अशी पुढील कृतींची सूचना देत असते; त्या मूर्तिमन्त दगडी चेहऱ्यावर आपल्या मनःस्थितीनुसार निरनिराळ्या भावभावनांचे तरंग उमटूं लागलेले दिसूं लागतात; आणि पाण्यांत जोरानें दगड फेकल्यानें होणाऱ्या पहिल्या खळ-खळाटानंतर प्रथम चिमुकली पण पुढें मोठीं मोठीं होत जाणारीं तरंगाचीं वलयें जराश्यानें स्पष्ट दिसावीत, तसें पहिल्यांदा नक्की ओळखता न येणारे एकमेकांत मिसळलेले भाव हळूंहळूं करुण, शृंगारिक किंवा शांत असे वर्णन करण्याजोगे स्पष्ट दिसूं लागतात—हाहि माझा एक अनुभव आहे. संगीताचा संवेदनाक्षम 'कान' असलेल्याला तंबो-ऱ्याच्या खर्जषड्जाच्या नि पंचमाच्या एकमेकांत मिसळून विरणाऱ्या आसेंतून 'गांधार' हा स्वर ऐकूं येतो असें म्हणतात; परंतु 'तो हा पहा' म्हणून 'कान' नसलेल्या दुसऱ्याला सांगून समजा-वून देतां येत नाहीं, तशी याबाबतींत माझी स्थिति आहे. एका नृत्यकाराच्या दोन पोजेस् (poses) पाहिल्या तर एकाचित्ततेनें त्यामधील दुवे मनांतल्या मनांत, दोन सुरांमधील श्रुतींच्या जाणिवेप्रमाणें, जुळूं लागतात, अंतःश्चक्षूंना दिसतातहि, पण वर्णन करून सांगतां येत नाहींत, एवढेंच नव्हे तर तपश्चर्येशिवाय स्वतःच्या नृत्यांतहि उतरवितां येत नाहींत.

## दोघींच्यामध्यें तिसरीचा नाच

पुण्यांत कांहीं महिन्यांपूर्वी 'चेतना कला-केन्द्रा 'तर्फे झालेला 'भरतनाट्यम्'चा कार्यक्रम चालू असतां मला याच्या उलट अनुभव आला. हा कार्यक्रम दोन (अनुक्रमें अठरा व पंधरा वयाच्या) मुलींनीं जवळ जवळ दोन अडीच तास केला. त्यांतील एकीचा अभिनय गोड तर दुसरीचें 'नृत्त' (अभिनयाविना केलेला नाच) अतिशय रेखीव—अशी गुणांची विभागणी दोघींत झाली असल्यानें, दुसऱ्या मुलीचें नृत्त पहातांना त्यांतूनच शरीराच्या नैसर्गिक वांकांचें सौन्दर्य उठावदारपणें प्रकट करणारी अजंठा वेरूळ येथील व दाक्षिणेकडील शिल्पकारांनीं खोदलेली सुरेख मूर्ति डोळ्यांसमोर








येऊन उभी राही, आणि त्या सबंध दगडी शरीर-सौंदर्यावर, योग्य भावाविना नेहमीं खुपणारी निस्तेज कळा पहिल्या मुलीचा जिवंत अभिनय पहातांच विरून जाऊन त्या चेतनारहित मनोमूर्तीच्या चेहऱ्यावर निरनिराळे भाव उमटूं लागल्याचा भास होई. दोघी मुली शेजारीं शेजारीं नृत्य करीत असतां, एकीचा निरनिराळ्या हावभावांच्या लेण्यांनीं विनट-णारा, निमुळत्या हनुवटीमुळें मोहक दिसणारा चेहरा नि दुसरीचें सारखें लवणारें आणि तरीहि ताठरपणें कमानीसारखें बांक दाखविणारें, वेताच्या छडीप्रमाणें लवचिक शरीर यांचें एकीकरण होऊन दोघींच्या-मध्यें या तिसऱ्याच मूर्तीचा नाच मी कितीवेळ पाहत राहिलें असल्यानें त्यांचे वर सांगितलेले वैयक्तिक दोष कळत असूनहि ठळकपणें मनावर परिणाम करणारे मला वाटले नाहींत. या साऱ्याचें श्रेय त्या दोघींच्या दोन तऱ्हेच्या एकाचवेळीं प्रकर्षानें झळकणाऱ्या कला-त्मक गुणांकडे जातें.

'भरतनाट्य' ही दक्षिणेकडील नृत्यपद्धति नृत्त व नृत्य ( साभिनय पदन्यास व हस्तविक्षेप ) या नृत्याच्या दोन्ही प्रमुख अंगांनीं सुसज्ज असली, ( भाव, राग, व ताल या तिन्ही नृत्यांगांच्या योग्य व सौंदर्यपूर्ण योजनेमुळेंच त्या पद्धतीस 'भ-र-तनाट्य' असें नांव दिलें आहे असेंहि कोणी म्हणतात ) तरी तोलून मापून बोलायचें म्हटलें तर नृत्ताचें पारडेंच किंचित् अधिक जड भरेल; असें असतांनाहि योग्य अभिनयानें आपलें उणें पडणारें नृत्ताचें अंग प्रेक्षकांच्या लक्षांत येऊं न देणाऱ्या त्या मुलीचें कौतुक करावें, कीं 'पदम्' किंवा 'शब्दम्'सारख्या—अभिनयाला भरपूर वाव देणाऱ्या नृत्यप्रकारांतहि केवळ हंसरी मुद्रा ठेवण्यापलीकडे कांहींहि अभिनय न करतां जिनें शरीराच्या रेखीव, तालबद्ध व सम चलनवलनावरच प्रेक्षकांची वाहवा मिळविली, तिला धन्य मानावें, हें मला समजेना. अर्थात् मी कांहीं भरतनाट्यांतील खांचाखोंचा पूर्णपणें जाणणारी नव्हे. तशा 'भरत-नाट्यम्'च्या दर्दींना कदाचित् त्यांचीं एकएकटीचीं व्यंगें क्षम्य वाटलीं नसतीं; परन्तु माझ्या इतपत नृत्याची आवड, त्याबद्दल जिज्ञासा व खोलांत शिरूं पाहाण्याची उत्सुकता असणाऱ्यांच्या, एवढेंच नव्हे तर सर्वसाधारण प्रेक्षकांच्या मनावरहि एवढा परिणाम ज्या दोघी मुली करूं शकल्या त्यांची कला उच्च दर्जाची होती हें खास !

ह्या दोघींचीं वैयक्तिक ( Solo ) नृत्यें मात्र त्या मानानें परिणामकारक होत नव्हतीं; कारण त्यांचे ते विशिष्ट कलात्मक गुण एकमेकांना पूरक होते. आणि एक प्रकर्षानें चमकणारा गुण दुसऱ्याविना माल लंगडाच पडत होता. आंधळ्यानें लंगड्याला पाठीवर घेऊन प्रवास करावा, तशी सोयीस्कर साथ होती एकमेकींची एकमेकींना !

## 'भरतनाट्यम्'चें वैशिष्ट्य

कार्यक्रमास सुरवात होण्यापूर्वीं धूपाचा किंचित् उग्र पण सात्त्विक वाटणारा सुवास दरवळत होता. घंटा वाजतांच आंतून दाक्षिणात्य गायनपद्धतीनुसार मंगलाचरण सुरूं झालें. महाराष्ट्रांत विशेषतः पुण्या-मुंबईंत वारंवार होणाऱ्या नृत्यप्रयोगांत युक्तायुक्तता न पहातां इंग्रजी व भारतीय वाद्यांची सरमिसळ करून प्रथमतः वाद्यवृन्दाचा कार्यक्रम केला जातो. पण कां कोणास ठाऊक, कर्कश वाटणाऱ्या दाक्षिणात्य पद्धतीच्या एकदेशीय गायनानें जी वास्तव वातावरण-निर्मिति व प्रेक्षकांच्या मनाची पूर्वतयारी योग्य तऱ्हेनें होते, ती त्या वाद्यवृन्दानें झालेली आजवर निदान माझ्या अनुभवीं नाहीं. पडद्यापुढें संथपणें तेवणाऱ्या दोन समयांच्या ज्योती आदर्श कलेचें तेज कसें संथ शान्त असतें तेंच दर्शवीत होत्यासें भासलें. 'अलारिपु' या भरतनाट्यम्मधील सुरवातीच्या पुष्पार्पणाच्या नृत्यानें कार्यक्रमाला सुर-वात झाली. प्रथम अत्यंत कलात्मक असा भरत नाट्यम्पद्धतीचा विशिष्ट नमस्कार करून नम्रपणें प्रेक्षकांना अभिवादन केल्यावर, दोन्ही पावलें जवळ जवळ चिकटून ठेवून त्या ताठ उभ्या राहिल्या. त्यांचे ते सडपातळ हात खांद्यांच्या समरेषेंत व पुढें एकमेकांना समांतर असें 'पताकामुद्रा' दाखवूं लागले. आणि डोळ्यांच्या तालबद्ध इषाऱ्यांना लव-लवणाऱ्या मानेची साथ मिळूं लागली. लगेच 'धित् धित् थै, धित् धित् थै' अशा मृदंगाच्या बोलांवर त्यांचें नृत्य सुरूं झालें. त्यांच्या







प्रत्येक अवयवांच्या हालचालींत दिसून येणारा संवाद ( Harmony ) भरतनाट्याच्या वैशिष्ट्याचा निदर्शक होता. हें नृत्य अतिशय खट्केदार आहे. त्यांत लालित्याबरोबरच एक प्रकारचा आकर्षक ताठरपणाहि असल्यानें त्यांत अनायासेंच वैचित्र्य निर्माण झालें आहे. त्यांतील सौंदर्य, सामर्थ्य नि संवाद यांवर अवलंबून आहे. या दृष्टीनें पाहतां 'कथक' ही उत्तर हिंदुस्थानी नृत्यकलाहि जितकी ललित तितकीच ताठर म्हणजे सामर्थ्याची निदर्शक आहे. परन्तु 'कथक' जसें पुरुष व स्त्रिया दोघेहि नाचूं शकतात आणि नाचल्यास तें चांगलें दिसतें, तसें पुरुषांनीं केलेलें भरतनाट्यम् पद्धतीचें नृत्य तितकेंसें उठावदार होत नाहीं, असें म्हणतात. खरें पाहिलें असतां परंपरेप्रमाणें 'भरतनाट्यम्' ही नृत्यसंस्था पुरुषशिक्षकांच्या हातोहातींच या पिढीपर्यंत येऊन पोंचली आहे. त्यांतील **चिनय्या, पुनय्या, शिवनन्दम्** व **वादिवेलु** हे तंजावर दरबारांतील नृत्यविशारद बंधु अत्यन्त कलानिपुण म्हणून प्रसिद्ध होऊन गेले, एवढेंच नव्हे तर त्यांचेच आजचे हयात वंशज श्री. **मीनाक्षीसुन्दरम् पिले** यांनीं तें कलाधन आजपर्यंत जतन करून विद्यादानानें अधिक समृद्धहि केलें आहे. असें असतांहि नृत्यशास्त्राप्रमाणें पुरुषांनीं हें नृत्य करणें अत्यंत अशुभ समजलें जातें. मी श्री. **रामगोपाल** यांचा 'भरतनाट्यम्'चा कार्यक्रम पाहिला आहे. त्यावेळीं जरी त्यांच्या नृत्यांत मला बाजवीपेक्षां अधिक नाजुकपणा आढळून आला, तरी त्याचें कारण त्यांची देहयष्टीच जात्या नाजुक वाटली. अर्थात् ते तांडवनृत्य करूं लागले तर तेंहि नाजुकच दिसेल या देहयष्टीमुळें ! हा दोष त्यांच्या शरीराच्या ठेवणीचा आहे, भरतनाट्याचा नव्हे. वरील शास्त्रनियम पडण्याचीं कारणें शोधूं गेलें असतां असें वाटतें कीं, स्त्रियांच्या शरीराची ठेवण निसर्गतः बांकदार असल्यानें या नृत्यपद्धतींतहि नृत्ताची विशिष्ट ढब स्त्रियांना शोभून दिसते, इतकेंच नव्हे तर स्त्रीशरीरसौष्ठवामुळें त्या कलेलाच उठाव अधिक मिळतो. दुसरें कारण असें असावें कीं भरतनाट्यांतील अभिनय बहुधा रसराज शृंगाराच्याच अधिष्ठानावर आधारलेला असल्यानें आणि सर्वसाधारणपणें 'प्रेम' हें स्त्रियांना जीवनसर्वस्व वाटत असल्यामुळें, शृंगाराच्या बारीकसारीक छटा, त्यांतील गूढें त्या जशा उकलून दाखवूं शकतील अन् तीं नैसर्गिकहि दिसतील, तसा पुरुषाचा तोच शृंगाराचा अभिनय सहज होणार नाहीं. झाला तरी पुरुषाच्या प्रकृतीला साजेसा दिसणार नाहीं. पुरुष हा जात्या स्त्रियांप्रमाणें भावनाप्रधान वृत्तीचा नसल्यानें त्याच्या शृंगाराच्या आविष्कारांतहि एक प्रकारचा संयम आढळला, पौरुष आढळलें तरच तें शोभून दिसेल. परंतु भरतनाट्यम् नृत्याची साथ करणाऱ्या पार्श्वगीतांत पुरुषी शृंगारिक भाव दाखविण्याला वाव मुळींच नसतो, आणि त्या नर्तकाला स्त्रियांचाच अभिनय करावा लागतो. या कारणाकरतांच पुरुषाचें कथाकलि नृत्य त्यांना ज्या मानानें शोभतें, त्या मानानें स्त्रियांना शोभत नसावें.

## विरोधी रंगांमुळें वैचित्र्य

भरतनाट्यम्च्या मी पाहिलेल्या कार्यक्रमांत मुलींचा पोशाख, खालीं पीतांबरासारखें बहुधा गडद रंगाचें नेसण व वर नीट बसणारें चोळीवजा ब्लाऊज असा होता. शिवाय मुलींच्या त्या घट्ट वेण्या, त्यावर त्यांच्या पद्धतीप्रमाणें फुलांचा तो जाडजूड गजरा, नाकाकानाला ठिकठिकाणीं भोंकें पाडून त्यांत अडकवलेलीं हिऱ्याचीं भूषणें इत्यादि साज जोडीला होताच. त्यांच्या पीतांबराचे व चोळीचे रंग बहुधा परस्परविरोधीच असतात. आणि वरील कार्यक्रम पाहिल्यावर माझें असें मत झालें कीं रंगसंगतींतील ही परस्परविरोधी रंगाचीं वस्त्रें धारण करण्याची पद्धत, एरवीं कितीहि भडक किंवा विसंगत वाटली, तरी नृत्याला विशेषतः कथाकली किंवा भरतनाट्यासारख्या नृत्यपद्धतीला तीं पोषकच ठरते; कारण एकमेकांत मिसळून जाणाऱ्या रंगांच्या वस्त्रांमुळें शरीराचें लोपूं पहाणारें कमानींचें (Curves) सौंदर्य वेगवेगळ्या विरोधी रंगांमुळें वैचित्र्यानें नि अधिक उठावदारपणें प्रतीत होतें.

यांतील अभिनय वर सांगितल्याप्रमाणें मुख्यतः शृंगाराचरच अधिष्ठित असल्यानें त्या मुलींच्या तीनचार पदांवरील अभिनयांत तोचतो-पणा फार होता. तरीहि एकीचें तें किंचित् ओठ चावून रागावणें, 'मला कांहीं ऐकायचें नाहीं' अशा अर्थी सरोष नजरेनें कानावर हात ठेवून बघत रहाणें, चढ्कन्










## दोघींच्या मध्यें नाचणाऱ्या तिसऱ्याच कलावतीचें नृत्य

टाळी वाजवून झालेल्या प्रकाराबद्दल आश्चर्य व्यक्त करणें—हे भाव जसे अतिशय गोड होते, तशीच दुसरीनें मूर्त केलेली, दुहेरी पदन्यास करित अन् दोन्ही बाजूस किंचित् झुकत मागें जाणारी श्यामसुंदराची छबीहि अत्यंत मोहक नि ऐटबाज वाटत होती. माझें दुर्दैव हें कीं मला त्यांच्या त्या तेलगु गाण्यांतील अर्थाचा मुळींच कांहीं पत्ता लागत नसल्यानें, त्या करीत असलेल्या अभिनयानें त्या गाण्यांतील अर्थ स्पष्ट होत होता किंवा नाहीं, होत असल्यास कितपत होत होता हें अजमावतां आलें नाहीं. माझ्यासारखीच इतर प्रेक्षकांचीहि स्थिति झाल्यानें त्यांतल्या अभिनयांत मुरलेल्या मुलीनें 'राखो लाज हमारी' कीं असेंच कांहींसें, मीराबाईचें भजन साभिनय म्हणून दाखविलें; परंतु राधा आणि मीरा यांच्या कृष्णप्रेमाचें अंतिम स्वरूप—अंतिम ध्येय एकच असलें तरी त्याचे रंग वेगवेगळे आहेत, त्याचे मार्ग भिन्न होते. हें त्यांतून लक्षांत येत नव्हतें, इतका तो अभिनय पुनः तोच तो एकरंगी वाटला. शिवाय पाहिजे तेवढें लालित्यहि तिच्या नृत्तांत नसल्यानें तो प्रयोग तेवढा यशस्वी झाला नाहीं.

### 'केलि' किंवा क्रीडा.

मुळींच विश्रांति व पुरेसें मध्यंतर न घेतां सतत दोन अडीच तास नाचणाऱ्या या दोन कलावतींना दम कसा तो माहित नसल्याचें पाहून भरतनाट्याला 'केलि' वा 'कुथु' (क्रीडा—Play) असें म्हणतात, त्याचें रहस्य माझ्या ध्यानांत आलें. दोन अडीच तास त्या स्वतः खेळल्या, प्रेक्षकांनाहि त्यांनीं खेळविलें !

त्यांच्या त्या वायुलहरीनें देंठापासून डोलणाऱ्या पुष्पांप्रमाणें लव लव हलणाऱ्या माना, त्यांचे ते तालावर नाचणारे सतेज डोळे, त्यांचे वाऱ्याच्या वेगानें नि सामर्थ्यानें होणारे हस्ताविर्भाव नि पदन्यास, या सर्वांतून त्यांच्या नसांनसांत खेळणाऱ्या जीवनरसाचें प्रत्यंतर येत होतें. त्या नाचल्या, त्यांचे आत्मे नाचले— आणि त्याबरोबर आमचीं मनेंहि नाचलीं ! !

# अर्ध - कथानक

[ उत्तरार्ध ]

महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार

[ सुमारें तीनशें वर्षांपूर्वी बनारसीदास नांवाचा एक जैन कवि होऊन गेला. त्यानें आपलें आत्मचरित्र 'अर्ध-कथानक' या नांवानें लिहिलें आहे. हें आत्मचरित्र सोप्या हिंदींत असून कवितावद्ध आहे. आत्मचरित्राच्या परिचयाचा पूर्वार्ध या मासिकाच्या पहिल्या अंकांत आला आहे.

आपल्याकडील भाषांतून जुन्या काळीं लिहिलेलीं आत्मचरित्रें अत्यंत विरळ आहेत. त्यामुळें बनारसी-दासाच्या आत्मचरित्राला फार महत्त्व आहे. तीनशें वर्षांपूर्वीचें समाजाचें जीवन समजून घेण्यास या अपूर्व आत्म-चरित्राचा उपयोग होणार आहे. पूर्वार्धांत बनारसीच्या बाळपणापासून तारुण्यापर्यंतचे ठळक प्रसंग निवेदन केले असून बनारसीचें, विद्यार्थी जीवन, त्याची इष्कबाजी, त्याचें काव्यलेखन, यांचा वृतान्त कथन केला आहे. एक हजार छंदांचा एक नवरसात्मक ग्रंथ त्यानें १४व्या वर्षी रचला त्यावरून त्याची काव्यशक्ति किती जबर होती याची कल्पना येते. आपलें काव्य अतिशृंगारिक, कल्पित, खोटें व भलत्याच तऱ्हेचें आहे असें वाटून त्यानें आपली काव्यरचना गोमतीमध्यें बुडविली याचें वर्णन केले आहे. यापुढचा उत्तरार्ध पुढें दिला आहे. ]

**ये**थून बनारसीच्या जीवनाला निराळें वळण लागलें. बापाला मुलगा सुधारला असें वाटलें. आणि

" तिस दिन सौं,
बानारसी करै धर्मकी चाह
तजी आसिखी फासिखी,
पकरी कुलकी राह " ॥ २७९ ॥

याप्रमाणें बनारसी आसिखीफासिखी ( म्हणजे इष्कबाजी--फिक्कबाजी ) सोडून देऊन धर्माच्या वाटेला लागला. तो धर्माचरण करूं लागल्यावर बापाला बरें वाटलें. (सं. १६६७) बापानें आपली सर्व संपत्ति एकत्र केली. आणि मुलाला बोलावून आणून

'अब गृहभार कंध तुम लेहु,
सब कुटुंब कौं रोटी देहु
यहु कह तिलक कियौ निज हाथ
[illegible]'

याप्रमाणें मुलाच्या अंगावर संसाराचा भार टाकला व असें केल्याचें निदर्शक म्हणून त्याला आपल्या हातानें टिळा लावला. टिळा लावण्याची ही चाल विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. येथून बनारसीचा संसार सुरूं झाला. गाड्या करून बनारसी इटाव्याला पोंचले. पोंचले तों संध्याकाळची वेळ. वरून पाऊस, खालीं चिखल, सर्व घरें बंद; कोठें उतरण्यास जागा नाहीं. अशा स्थितींत गांवाच्या तटाबाहेर चौकीदाराच्या झोंपडी-पाशीं आले. त्याला दया आली. 'रात्रीं येथें रहा' म्हणाला. पण शर्त एक : 'सकाळ झाल्यावर चौकशी होईल, आणि मी माझें बक्षीस घेईन, त्या-वेळीं जाऊं देईन.' पुढें त्यालाहि दया आली आणि त्यानें एक तट्ट्याची चटई देऊन सांगितलें कीं, 'तुम्ही खाटेखालीं निजा. मला खाटेशिवाय झोंप येत नाहीं.' 'एवमस्तु' म्हणून—" जैसा कातै तैसा बनै. जैसा बोवे तैसा लनै—"



अनुक्रमणिका

## व्यापाराची दुर्दशा

तेथून बनारसी प्रयागास आले व व्यापार करूं लागले. कपड्याचा वगैरे व्यापार केला. त्यांत तोटाच आला. असा कांहीं नफातोटा झाला. "नगर आगरे कौ व्योपार, मूल न जानै मूढ गंवार." अशी आग्र्याच्या व्यापाराची स्थिति होती. एकदां बनारसीच्या कमरेला बांधलेलें जवाहिरच गळून गेलें, तर कुठें बिजारीची नाडी उंदीर घेऊन पळाले; पुनः, कुठें घेतलेले पैसे मध्येंच विसरले. आणि याप्रमाणें बनारसीच्या व्यापाराची दुर्दशा झाली. 'पुंजी खोइ बनारसी' अन् 'भए भिकारी भेख!' खरगसेनाला हें कळल्यावर त्याला फार वाईट वाटलें. मग बनारसी घरांतच बसून राहिला व कांहीं मोडतोड करून कसे तरी दिवस काढूं लागला. बसल्या बसल्या 'मृगावती' आणि 'मधुमालती' हे दोन ग्रंथ, दहावीस माणसें जमवून त्यांना बनारसी वाचून दाखवूं लागला.

घरांत खाण्यास कांहीं नव्हतें. बनारसीदास एका कचोरीवाल्याकडे गेला. तो रोज बनारसीकडे श्रवणाला येत असे. त्याचेपासून उधारीनें कचोरी घेऊन बनारसी आपली गुजराण करूं लागले! एक दिवस आमच्या या बनारसीबुवांनीं कचोरीवाल्यास हळूंच कानांत सांगितलें. 'मजजवळ कवडीहि नाहीं.' तेव्हां कचोरीवाला म्हणाला, "वीस रुपये आकार होईतोंपर्यंत खुशाल कचोरी खात रहा. भिऊं नका." याप्रमाणें सहासात महिने बनारसीनें केवळ कचोरी खाऊन काढले. त्याचा आकार १४ रुपये झाला. म्हणजे त्या काळांत रोजीं एक आण्याची कचोरी खाऊन बनारसीचें पोट भरलें, असें दिसतें. मग कांहीं सासुरवाडीचे नातलग येऊन भेटले आणि त्यांनीं मिळून आग्र्यांत व्यापार सुरूं केला. सं. १६७० मध्यें बनारसीनें ही भागीदारी संपविली. या अवधींत, 'जो पाया सो खाया सर्व, बाकी कच्छू न बांचा दर्व (म्ह. द्रव्य).' रस्त्यांत एक दिवस सहज एक गठडी सांपडली. त्यांत रत्नें निघालीं. तो शुभशकुन समजून बनारसीदास सासुरवाडीस आले. रात्रीं बायकोनें खरी खरी हकीकत विचारली. ती थोडे आढेवेढे घेऊन त्यांनीं सर्व सांगितली. तेव्हां बायको म्हणाली, "नारी कहै सुनौ हे कंत, दुखसुखकौ दाता भगवंत." मग एक दिवस सकाळीं अरगलपूर म्हणजे आग्र्याची हकीगत ऐकत असतांना बायकोनें हळूंच बनारसीच्या हातांत २० रुपये आणून दिले आणि ती म्हणाली, "ए मैं जोरि धरे थे दाम, आए आज तुम्हारे काम." ती जें आणखी म्हणाली, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे—"साहिब चिंत न कीजै कोइ, **पुरुष जिए तो सब कछु होइ.**" मग ती आईकडे गेली. तिला सर्व हकीगत सांगितल्यावर तिनेंहि गुप्तपणें २०० रुपये जांवयास देण्याकरितां दिले व आग्र्यास जाऊन त्यानें व्यापार करावा असें सांगितलें. नवराबायकोंत खूप वाटाघाट झाली. मग बनारसी तयारीला लागले. या अवसरांत त्यानें **'अजितनाथ छंद'** व दोनशें श्लोकांची **'नाममाला'** लिहिली. मग "कपरा धोइ भयौ तय्यार, लियौ मोल मोतीकी हार." हें घेऊन बनारसी आग्र्यास आले. ४० रुपयांस घेतलेल्या मोत्याचा हार ७० रुपयांस विकला. तेव्हां त्यांस वाटलें कीं, जवाहिराचा व्यापार करावा. मग नरोत्तमदासाच्या संगतींत त्यानें व्यापार केला. एकदां व्यापार करण्यासाठीं नरोत्तम, त्याचा सासरा व बनारसी हे पाटण्यास निघाले. फिरोजाबादेहून शहाजादपूरला आले. तेथें रथांतून उतरून पायीं चालूं लागले. एका सराईत राहिले. एक मजूर केला. एक प्रहर रात्र उलटल्यावर पहांट झाली, असें वाटून चालूं लागले. वाट चुकले आणि जंगलाच्या तोंडाशीं आले. ओझेवाला घाबरला आणि पळून गेला. हे तसेच रडत बसले. मग एका

---

(१) मृगावती :— कर्ता–चिस्ती शेख बुन्हाणचा शिष्य कुत्बन. या ग्रंथांत चंद्रनगरचा राजा गणपतिदेव याचा पुत्र आणि कंचनपूरचा राजा रूपमुरारी याची कन्या मृगावती यांच्या प्रेमकथेच्या आधारानें ईश्वरप्रेमाचें स्वरूप सुफी शैलीप्रमाणें वर्णन केलें आहे. रचनाकाल विक्रमसंवत् १५५८ (२) मधुमालती :– कर्ता – मंझन. याचाहि विषय मृगावतीप्रमाणें आहे. मलिक मुहम्मद जायसीनें मुग्धावती, मृगावती, मधुमालती आणि प्रेमावती अशा चार प्रेमग्रंथांचा उल्लेख केला आहे.








गाठोड्याची तीन गांठोडीं करून अर्धरात्र उलट- ल्यावर चालूं लागले. आणि जों आले तों चोरांचा गांव लागला. त्या गांवच्या चौधऱ्यानें त्यांना हटकलें. तेव्हां बनारसीनें एक श्लोक म्हणून त्यास आशीर्वाद दिला. लागलीच, ' कहै चौधरी आवहु पास, तुम्ह नारायण मैं तुम्ह दास ।

आइ बसहु मेरी चौपारी,
मोरे तुम्हरे बीच मुरारी ॥ ४१९ ॥

याप्रमाणें ज्यांना बनारसी चोर समजत होता ते, श्लोक म्हणतांच, एकदम वळले; आणि पाहुण्यांना देवासारखें मानून आपल्या घरीं राहण्यास बोलावूं लागले. अशा आदबशीर गांवकऱ्यांना बनारसी चोर कां म्हणतो, हें त्याच्या लिहिण्यावरून कळत नाहीं. चोर म्हटलेले हे गांवकरी हिंदु किंवा सनातन धर्माचे पक्षपाती असल्याचें दिसतें. म्हणूनच जवळचें सूत काढून त्याची जानवीं करून ह्या तिघां व्यापाऱ्यांनीं गळ्यांत घातलीं, आणि

" माटी लीनी भूमिसौं, पानी लीनौं ताल
विप्रवेष तीनौं बनैं, टीका कीनौ भाल " ॥ ४२२ ॥

भस्म लावून, जानवें घालून त्यांनीं विप्रवेष धारण केला. पहांटे चौधरी म्हणाला, " पंडितराय, चला, मी आपणांस वाट दाखवतों " आणि तीन कोस बरोबर येऊन या भल्या चौधरीनें ह्या वेषधारी ब्राह्मणांस फत्तेपूरच्या वाटेस लावलें.

## मुसलमान अमीराचा विद्याभिलाष

मध्यंतरीं व्यापाराची व संसाराची बरीच घडामोड झाल्याचें बनारसीनें थोडक्यांत वर्णन केलें आहे. या काळांत त्यानें यात्रा व धर्मकृत्यें केलीं. एकदां जोनपुरास, मोठ्या किलीचचा मुलगा धाकटा किलीचखान, यानें बोलावणें पाठवून बनारसीचा सन्मान केला. बनारसी म्हणतो,

" बेटा वड़ो किलीचकौ
च्यार हजारी मीर,
नगर जौनपूर कौ धनी,
दाता पंडित बीर ॥ ४४९ ॥

चीनी किलिच बनारसी, दोऊ मिले विचित्र."
अशी या च्यार हजारी अमीराची व बनारसीची मैत्री जुळली. पण मध्येंच कोणा एका दुष्ट मनुष्याच्या कारवाईमुळें बनारसीवर कांहीं संकट आलें. तथापि पुनः बनारसी व चिन किलीचखान यांचें सख्य झालें. बनारसीजवळ चिन किलीच पुढें दिल्याप्रमाणें ग्रंथवाचन करूं लागला.

" कबहुं नाममाला पढ़ै,
छंद, कोस, श्रुतबोध
करै कृपा नित एकसी,
कबहुं न होइ विरोध "॥ ४५५ ॥

ही घटना लक्षांत घेण्यासारखी आहे. हा मुसलमान अमीर बनारसीजवळ श्रुतबोध, नाममाला, छंद आणि कोश वगैरे संस्कृत–प्राकृत ग्रंथांचा अभ्यास करूं लागला. असा अभ्यास त्याकाळीं करणारे कांहीं विद्याभिलाषी मुसलमान आपणांस जागजागीं आढळतात. दारा, बादायुनी, अबुलफझल यांचीं उदाहरणें प्रसिद्ध आहेत.

सं. १६७२त चिन किलीच मरण पावला. पुढें आगानूर नांवाच्या उमरावानें जोनपूरांत पुष्कळ धुमाकूळ उडवला.

" आगानूर बनारसी, और जौनपूर बीच
कियौ उदंगल बहुत नर, मारे करि अधमीच
हकनाहक पकरे सकल, जड़िया कोठीवाल
हुंडीवाल सराफ नर, अरू जोंहरी दलाल.
काहू मारे कोररा, काहू बेडी पाइ
काहू राखे भाखसी ( भट्टी ),
सबकों देइ सजाइ " ॥ ४६७ ॥

याप्रमाणें आगानूरनें मोठी जलाली केली. तेव्हां बनारसी मित्रासहवर्तमान चाळीस दिवस जंगलांत लपून राहिले. आगानूर आग्र्याला गेला व त्यानें सर्वांना सोडून दिलें. पण दोघा चौघा श्रीमंतांना मात्र धरून तो आपल्याबरोबर घेऊन गेला.

मग बनारसी घरीं आला. येथें बनारसीनें एक गंमतीची गोष्ट सांगितली आहे. बनारसीचा मित्र नरोत्तम व बनारसी, दोघेहि एकत्र व्यापार करीत असत. नरोत्तमाच्या बापानें मुलाला एक गुप्त पत्र पाठवलें. तें नरोत्तमानें बनारसीला दाखविलें. क्षेमकुशलाच्या मामुली दहापांच ओळी लिहिल्यानंतर बापानें लिहिलें होतें, ' खरगसेन व बनारसी हे दोघेहि दुष्ट आहेत. तुला बुडवतील. यांच्या संगतींत जे राहतील ते








भिकारी होतील. ' पण नरोत्तम बनारसीच्या हातां-पायां पडूं लागला; आणि म्हणाला कीं, " तूं मायबाप आहेस. मनावर घेऊं नकोस. " मग दोघांची पुनः मैत्री झाली. नरोत्तमाच्या आग्रहास्तव रांनी तयार केलेली एक स्नेहभावाची सवय्या बनारसीनें यावेळीं रचली व ती भिकारी रस्तोरस्तीं म्हणूं लागले.

## संस्मरणीय आग्रा सफर

पुढें बनारसी व नरोत्तम भागिदारी तोडून स्वतंत्र झाले आणि सं. १६७३ च्या ज्येष्ठांत खरगसेन मृत्यु पावला. पुनः महिनाभरानें बनारसीनें कपड्याचा व्यापार सुरूं केला. तोंच आग्र्याहून स्वतः येऊन हिशोब चुकविण्याचें बोलावणें आल्यावरून, शिवराम नांवाच्या ब्राह्मणावर दुकान सोंपवून, बनारसी आग्र्याला गेला. तो आषाढाचा महिना होता. बनारसी वगैरे मिळून एकोणीसजणांचा जथा जमला व सारे हसंत खेळत चालले. त्यांत मथुरेचे दोन ब्राह्मण होते, एक जोनपूरचाच महेश्वरी कोठीवाला होता. येतां येतां घाटमपूरजवळील कोराराय ( कुर्रा, चित्तरपूर ) या गांवाजवळ ते आले; सराईमध्यें उतरले. माथुर ब्राह्मण गवळीवाड्याकडे गेले. त्यांपैकीं एकानें बाजारांत जाऊन एक रुपया मोडून आणला. नंतर जेवणाचें साहित्य विकत आणून पुढील तयारीस लागले. तों इतक्यांत मोड देणारा सराफ येऊन ब्राह्मणानें दिलेला रुपया ' गैरसाल ' म्हणजे खोटा आहे म्हणून बदलून मागूं लागला. ब्राह्मणानें खोटा रुपया आपला नाहीं म्हणून सांगितलें, भांडण जुंपलें. मथुरावासी ब्राह्मणांनीं सराफास सडकून चोप दिला. लोकांनीं विनंति केली पण त्यांनीं सोडलें नाहीं. इतक्यांत सराफाचा एक भाईबंद मदतीस आला. आणि पाहतां पाहतां त्या कपटी मध्यस्थानें ब्राह्मणांचीं सर्व वस्त्रें तपासलीं तों त्यांत पंचवीस रुपयांची गठडी सांपडली. मग त्यानें पुकारा केला कीं, " हे सगळे रुपये खोटे आहेत पहा; आतां असा जाऊन कोतवालींत फिर्याद गुदरतों. " मग ब्राह्मण मेल्याचें सोंग घेऊन पडले. वाण्यानें सर्वांना साक्षी ठेवून तो ती गठडी घेऊन गेला. खरे रुपये त्यानें घरीं नेले व खोटे ब्राह्मणांच्या गठडींत लपवून आणून ठेवले. गांठ बांधून ती गठडी घेऊन तो कोतवालाकडे गेला व त्याला ते खोटे रुपये दाखवून म्हणाला, " इकडे पुष्कळ ठग आले आहेत. संध्याकाळीं सगळे एक ठिकाणीं जमून घोड्यावर बसून पळून जातात. " मग कोतवाल हकीमाकडे म्हणजे न्यायाधिशाकडे गेला. हकीमाच्या कानांत त्यानें सर्व हकीगत सांगितली. हकीमानें आपला एक दिवाण त्याच्या बरोबर दिला. मग कोतवाल, दिवाण व चारशें गांवकऱ्यांची धाड सराईवर आली. कोतवाल आणि दिवाण खाटा टाकून बसले व त्यांनीं ब्राह्मणांस बोलावणें पाठविलें. दोघेहि अधिकारी अर्थातच मोगल होते. त्यांनीं सर्व मुशाफिरांची 'कोठले, कोण' म्हणून चौकशी सुरूं केली. ब्राह्मण म्हणाले, " आम्ही मथुरेचे. " महेश्वरी म्हणाला, " मी जोनपूरचा." बनारसी म्हणाला, " मी जव्हेरी आहे. आम्ही सर्व व्यापारी आहोंत, ठग नाहीं. आम्ही आग्र्यास जात आहोंत. " बनारसीचें बोलणें ऐकून अधिकारी फारशीमध्यें बोलूं लागले. " एक कहै ए ठग तहकीक, एक कहै व्योपारी ठीक. " असा दोघां अधिकाऱ्यांचा मतभेद झाला. तेव्हां कोतवाल म्हणाला, " जलदी आटपा. उगाच तंटा काय लावला आहे ? " दिवाण म्हणाला, " कोतवाल मूर्ख-नादान आहे. कारण ' रातिसमै सूझै नहिं कोइ, चोर साहुकी निरत न होइ.' रात्रींच्या वेळीं ठीक निवाडा होऊं शकणार नाहीं. सकाळीं ठीक निर्णय होईल. " मग कोतवाल या मंडळीस म्हणाला, " तुम्ही आतां आपली येथें ओळख असेल तर काढा. आणि कुर्रा, घाटमपूर व बरी हीं तीन गांवें मी तुम्हाला नेमून देतों. त्यांतली ओळख काढा. विचार करा. आम्ही जातों. " म्हणून चौकशी-पहारे ठेवून तो गेला. मग बनारसी व महेश्वरी विचार करीत बसले. रात्र सरतां सरेना. एक प्रहर रात्र उरली. तेव्हां महेश्वरी म्हणाला, " गड्या, माझ्या धाकट्या भावाचें लग्न बरी गांवांत झालें. तेव्हां मी वरातीला त्या गांवीं आलों होतों." बनारसी म्हणाला, " मूर्खा, इतका वेळ कां सांगितलें नाहींस हें ! " महेश्वरी म्हणाला, " भ्यालों, गडबडलों. म्हणून आठवणच झाली नाहीं. आतां आठवलें, तेव्हां फिकीर नाहीं. " मग बनारसीला

जरा आनंद झाला. घटकेंत त्याला वाटे, चिंता नाहीं. घटकेंत वाटे कीं, खोटें तर नसेल ? तों उजाडलें. मजुरांच्या डोक्यावर शूळ देऊन एकोणीस मजुरांना घेऊन कोतवालांची स्वारी हजर झाली. तो म्हणाला, " तुम उनीस प्रानी ठग लोग, ए उनीस सुली तुम जोग. —तुम्ही एकोणीस ठग तेव्हां एकोणीस शूळ तुमच्यासाठीं आणिले आहेत. " घटका-भरानें हकीम व दिवाण आले. त्यांच्या मागें गांवकऱ्यांचा तांडा होताच. मग बनारसीनें वरींत ओळख निघाल्याचें सांगितलें. तेव्हां, " तब दिवान कहै स्याबास यह (तो) बात कही तुम रास " (रास्त). दिवाण खूष झाला. ' शाबास, ठीक,' असें म्हणाला. ' आतां माझ्याबरोबर चला वरींत. ' मग चौविजण वरींत आले. तो महेश्वरी वरींच्या ओळखीच्या सावकारांच्या घरींच राहून गेला ! झालें ! ओळख तर पटविली ! मग ते अधिकारी मोंगल बनारसी-कडे आले व म्हणाले,

" आथि कह्यौ, तुम सांचे साहु,
करौ माफ यह भया गुनाहु. "

' आमचा गुन्हा माफ करा ! ' यावर " तब बनारसी कहै सुभाउ, तुम साहिब, हाकिम उमराऊ " " आपण थोर आहांत, अधिकारी आहांत. आमचें प्राक्तन होतें म्हणून असें घडलें " असें बनारसीनें समर्थन केलें. " भावी अमिट हमारा मता, इसमें क्या गुनाह क्या खता " " शिवाय होणार तें कांहीं चुकणार नाहीं. ह्यांत कसला गुन्हा नि काय ? " बनारसीची माफी मागून मोगल निघून गेले. बनारसी सराईतच थांबला. इतकी कथा झाल्यावर आमचे ' माथुर ' ब्राह्मण पुढें झाले आणि कुरकुरूं लागले. " आमचे मात्र पैसे गेले ! " मग एक प्रहर दिवस लोटल्यावर बनारसीनें काय केलें कीं सहा सात शेर सुवासिक तेल बरोबर घेतलें; आणि हाकिम, दिवाण, कोतवाल या सगळ्यांना थोडें थोडें नजर केलें व त्यांच्याशीं स्नेह केला. नंतर बनारसीनें अर्ज सादर केला कीं त्या ठग सराफाकडून ब्राह्मणांचे पैसे परत देववावेत." तेव्हां अधिकारी म्हणाले,"तुम्ही सांगण्या-पूर्वीच आम्ही त्याचा तपास केला. तो सराफ त्या दिवशीं रात्रींच पळून गेला. आतां सुटकेबद्दल शेरणी वाटा आणि चला पुढें. " मग बनारसीनें विचार केला कीं, " जोर केल्याशिवाय पैसे मिळणार नाहींत. पण इथें आमचें कोण आहे ? जाऊं द्या, झालें तें झालें." परत येऊन सगळ्यांनीं भोजन केलें. संध्याकाळीं महेश्वरी वरींहून परत आले. रात्रभर सर्वजण आनंदांत राहिले. सकाळीं उठून चालूं लागले व म्हणाले, " काळाच्या तडाख्यांतून सुटलों. " वाटेंत बनारसीचें दुर्दैव उभें राहिलें. त्याचा परममित्र व भागिदार मेल्याची चिठ्ठी कुणी वाटेंत आणून दिली. बनारसीनें फार आकांत केला. पण पुढील विचारानें आपल्या मनाचें समाधान केलें.

" लोभ मूल सब पापकौ
दुख कौ मूल सनेह
मूल अजीरन व्याधिकौ,
मरनमूल यहु देह " ॥ ५५१ ॥

मंडळी पुढें जाऊं लागली तों पुनः ते माथुर ब्राह्मण आडवे आले. " पैसे न मिळतील तर आमचें मरण आहे " असें ते म्हणाले. मग विचार करून बनारसीचे तेरा व महेश्वरींचे बारा मिळून ब्राह्मणांच्या पंचवीस रुपयांची भरती केली. तेव्हां " बांमन गये असीस दै भये बानिक निवार. " मग बनारसी घरीं आला व मित्राच्या मृत्यूबद्दल, ' हे मित्र, हे मित्र ' म्हणून शोक करूं लागला. याप्रमाणें बनारसीची ही संस्मरणीय आग्रा-सफर झाली.

या सफरीमध्यें जो अद्भुत प्रकार घडला तो बनारसीच्या शब्दांत वर दिला आहे. प्रत्यक्ष प्रसंग अद्भुत, मनोरम आहे हें तर खरेंच. परंतु तत्कालीन न्यायनिवाड्यांचा व प्रत्यक्ष अनुभवाचा नमुना म्हणूनहि या बनारसी-कथेचें आगळी एक अपूर्वत्व आहे. अन्यप्रमाणांवरून त्यावेळच्या न्याय-निवाड्याची कांहीं कल्पना आपणांस येते. व्यापाराच्या निमित्तानें हिंदुस्थानांत यावेळीं संचार करणाऱ्या अनेक युरोपियन प्रवाशांनीं व व्यापाऱ्यांनीं वर्णन केलेले आपले विविध अनुभव आणि जमविलेली नाना प्रकारची माहिती आज आपणांस उपलब्ध आहे. तथापि युरोपियन प्रवाश्यांची असलीं लिखाणें पुष्कळदां एकांगीपणाच्या दोषानें ग्रस्त झालेलीं आढळतात. अर्थात् तौलनिक दृष्टि त्यांच्यांत अधिक आहे. यामुळें त्यांच्या अनुभवांचें महत्त्व केव्हांहि कायमच राहील. परंतु त्याच








विषयासंबंधानें हिंदुस्थानांतील एखाद्या माहीतगार रहिवाश्यानें सांगितलेल्या अनुभवाचें महत्त्व कांहीं विशेष आहे हें उघड आहे. आज तरी बनारसीची ही सत्यकथा या दृष्टीनें अद्वितीय समजली जाईल. कोतवालावर हकिमाचा कसा दाव होता, निवाडे करतांना ते गांवकऱ्यांच्या समक्ष कसे केले जात, अपराध्यांस सुळावर चढविण्याची व्यवस्था कशी होती आणि तिचा बाऊ कसा करीत इत्यादि गोष्टींचें चित्र बनारसीच्या वरील वर्णनावरून आपणांस यथातथ्यपणें रेखाटतां येतें, हा लाभ कांहीं लहानसहान नाहीं.

## राजविलासी सावकार

यापुढें बनारसीच्या ग्रंथांतून आतां एक निराळ्याच प्रकारचा अनुभव नमूद करतों. बनारसी निघाला होता सावकाराचा हिशोब चुकविण्यासाठीं. तों वाटेंत हें शूल प्रकरण भोंवलें. आतां सावकार-प्रकरण पाहूं. सावकाराकडे बनारसी आला पण हिशोब-फिशोब यांची चौकशीच होईना. कारण हे थोर सावकार

बैठे साहु ( सावकार ) विभौ,
मदमाति ( विभवमदमत्त )
गांवहिं गीत कलावतपांति,
( कलावंतांची पंगत ) ॥ ५५८ ॥
घुरे पखावज, बाजै तांति
सभा साहिजादेकी भान्ति
दीजहि दान अखंडित नित्त
कवि बंदीजन पढहिं कवित्त ॥ ५५९ ॥
कही न जाई साहिबि सोइ,
देखत चकित होइ सब कोइ.

येणेंप्रमाणें बनारसी पातशाही थाटाच्या ' साहेबींत ' आणि कलावन्तांच्या मैफलींत लुप्त होऊन गेला. साहजिकच,

" बनारसी कहै मनमाहिं,
लेखा आइ बना किस पाहिं ॥ ५६० ॥
सेवा करी मास द्वै चारी,
कैसा बनज ( व्यापार ) कहां कीं रारी (तंटा)
जब कहिए लेखेकी बात,
साहु जवाब देहि परभात ॥ ५६१ ॥
[illegible] जाम (प्रहर)
सूरज उदै अस्त है कहां,
विषयी विषयमगन है जहां ॥ ५६२ ॥

बनारसीचे उद्गार यथार्थ आहेत. अशा प्रकारचे राजविलासी सावकार आग्र्याच्या वैभवशाली राजधानींत यावेळीं कसे नांदत होते, त्याचें हें चित्र लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या सावकाराचें नांव सबलसिंगजी. मग अंगनदास नांवाचा दोन्ही पक्षांचा भला मित्र बनारसीस तेथें भेटला आणि हिशोब एकदांचा मिटला. एकमेकांच्या फारकती झाल्या. सं. १६७३ त बनारसीनें आपला निराळा डेरा दिला व व्यापार चालू केला.

## 'गांठीका रोग'

इतक्यांत एक नवें संकट उभें राहिलें. कदाचित् तें साऱ्या हिंदुस्थानांतहि असेंच नवें आणि भयंकर होतें. हें संकट म्हटलें म्हणजे गांठीचा ताप अथवा प्लेग. ह्या तत्कालीन प्लेगाचें वर्णन आपणांस अन्यत्र उपलब्ध आहे. बनारसीच्या वर्णनानें त्याला स्वानुभवाचा दुजोरा मिळत आहे. ' इसही समय ईति (दैवीसंकट) बिस्तरी परी आगरे पहिली मरी. '

जहां तहां सब भागे लोग,
परगट भया **गांठीका रोग** ॥ ५७२ ॥
निकसै गांठि मरै छिनमाहिं ( क्षणांत )
काहूकी बसाइ किछु नाहीं
चूहे ( उंदीर ) मरहिं, बैद मर जाहिं,
भयसौं लोग-अंन नहिं खाहिं ॥ ५७३ ॥

गांठ, उंदीर, वगैरे प्लेगाचीं सर्व निर्णायक लक्षणें बनारसीच्या वर्णनांत आलीं आहेत. किंबहुना या रोगाला ' गांठीका रोग ' असे त्यानें स्पष्ट म्हटलें आहे. या ठिकाणीं मरी म्हणजे प्लेगच होय. यावेळीं बनारसी, आग्र्याजवळ अजीजपूर म्हणून एक ब्राह्मणांचा गांव होता ( आजहि या गांवांत ब्राह्मण पुष्कळ आहेत ), तेथें जाऊन राहिला.

## ' पैजाराचा खेळ '

यानंतर बनारसीनें अहिछत्रपूर, हस्तिनापूर, दिल्ली, मेरठ, कोल ( अलिगड ) वगैरे ठिकाणच्या यात्रा केल्या व कांहीं व्रतें केलीं. मग सं. १६७७ त त्याची आई वारली. नंतर त्यानें तिसरें लग्न

अनुक्रमणिका

अध्यात्मचर्चेंत शिरला व समयसार वगैरे ग्रंथांचें त्यानें वाचन केलें. '**ग्यानपचिसी,**' '**ध्यानबत्तिशी**' '**अध्यातम के गीत**' '**सीवमंदिर**' वगैरे प्रकारची काव्यरचना बनारसीनें यावेळीं केली. इतकें झालें, तथापि बनारसी म्हणतो, 'बिनु आचार भई मति नीच.' देवाचाहि नैवेद्य खावा, आणि मित्रमंडळींच्या चांडाळचौकडींत पैजाराचा खेळहि खेळावा असा त्याचा खाक्या चालला. "कुमतीचारि मिले मनमेळ, खेला पैजारहुका खेल" "सिरकी पाग लेहिं सब छीन, एक एककों मारहिं तीन" याप्रमाणें खेळांत एकेकांच्या डोक्याची पगडी पळवावी आणि एकमेकाला तीनतीन पैजारा माराव्या. बनारसी म्हणतो,

" चंद्रभान बानारसी,
उदैकरन अरु थान ( थानमल्ल )
चारों खेलहिं खेल फिरि
करहिं अध्यातम ग्यान ॥ ६०२ ॥

इतकेंच काय, पण पुढलें ऐकाल तर तोंडांत बोट घालाल !—

नगन होंहि चारों जनें,
फिरहिं कोठरीमाहिं
कहहिं भए मुनिराज हम,
कछू परिग्रह नाहिं ॥ ६०३ ॥
गानिगानि मारहिं हाथसों,
मुखसौं करहिं पुकार
जो गुमान हमकर गहे,
ताके सिर पैजार ॥ ६०४ ॥
गीत सुनें बातें सुनहिं
ताकी बिंग बनाइ
कहैं अध्यातममै अरथ,
रहैं मृषा लौ लाइ ॥ ६०५ ॥

पुढें अशुभ संपल्यावर बनारसी म्हणतो, " सहजहि खेल छूटि तब गया " असा हा खेळ संपला. लोक बनारसीला दोष देऊं लागले. पण इतर तिघांना दोष दिला नाहीं. बनारसी म्हणतो,

" निंदा थुति जैसी जिस होइ,
तैसी तासु कहैं सब कोइ
पुरजन बिना कहैं नहि रहैं,
जैसी देखें तैसी कहैं ॥ ६०९ ॥
सुनी कहहिं देखी कहहिं,
कलपित कहैं बनाइ
दुराराधि ए जगत जन,
इन्हसों कछु न बनाइ " ॥ ६१० ॥

याप्रमाणें बनारसीची विचित्र अवस्था सं. १६८४ पर्यंत चालली. तों इतक्यांत २२ वर्षें राज्य करून छत्रपति जहांगीर मेला आणि शहाजहान सुलतान झाला. या अवधींत बनारसीनें संसारांत पुष्कळ दुःखें सोसलीं. त्याचीं मुलें जगतच नसत. या काळांत बनारसीनें '**सूक्तिमुक्तावली**' '**अध्यातमबत्तीसिका**' '**पयडी**' '**फागधमाल,**' '**सिंधुचतुर्दशी,**' '**झूलना**' वगैरे, अनेक स्वतंत्र आणि स्फुट काव्य-रचना केली. याच काळांत प्रख्यात पंडित रूपचंद यांच्या संगतींत बनारसी आला. त्यानें बानारसीला फार आनंद झाला. पण दोन वर्षांतच रूपचंद मृत्यु पावले. रूपचंदांच्या संगतिमुळेंच, बनारसी म्हणतो, आपण पक्के जैन झालों.

" सुनिसुनि रूपचंदके बैन,
बानारसी भयौ दिढ जैन "

या काळांत बनारसीनें सं. १६९३ त 'समैसार' नाटकाची रचना केली. आणखीहि अनेक रचना केली. तोंच त्याच्या तिसऱ्या पुत्राचा मृत्यु झाला. बनारसी म्हणतो, " जगमैं मोह महाबलवान, करै एक सम जान अजान " याप्रमाणें सं. १६९५ पर्यंतचा संसार पुरा झाला. त्यांत,

तीन बियाहीं भारजा,
सुता दोइ, सुत सात
नौ बालक हूए मुए,
रहे नारि नर दोई
ज्यौं तरवर पतझार व्है,
रहैं ठूंठसे होइ ॥ ६४३ ॥

## अर्धकथानक अर्ध्या आयुष्याचें चित्र

पुढें त्यानें आपले गुणदोष सांगितले आहेत. प्रथम बनारसी आपले गुण सांगतो ." भाषा, कबित अध्यातममाहिं, पंडित और दूसरो नाहिं,

छमावंत, सन्तोषी भला,
भली-कबित पढिवेकी कला ॥ ६४९ ॥



पढै सौंसकृत, प्राकृत, सुद्ध,
विविध देशभाषा प्रतिबुद्ध ॥ ६४८ ॥
जानै सबद अरथकौ भेद,
ठानै नहिं जगतकौ खेद.
मिठबोला सबही सों प्रीति,
जैन धरमकी दिढ परतीति,
सहनसील नहिं कहै कुबोल,
सुथिर चित्त नहिं डावां डोल ॥ ६४९ ॥

आतां दोष सांगतो,

" क्रोध, मान माया जलरेख,
पै लछमीकौ मोह विशेख ॥ ६५२ ॥
थोरे लाभ हरक बहु धरै,
अलपहानि बहु चिंता करै.
मुख अवद्य भापन न लजाइ,
सिखइ भंडकला पनलाइ ॥ ६५४ ॥
भाखै अकथकथा विरतंत,
ठानै नृत्य पाइ एकंत
अनदेखी अनसुनी बनाइ,
कुकथा कहै सभा में आइ ॥ ६५५ ॥
होइ निमग्न हासरस पाइ,
मृषावाद बिनु रह्या न जाइ ॥

याप्रमाणें गुणदोष सांगून बनारसी म्हणतो,

" बरस पंचपंचास लौं,
भाख्यौ निजविरतंत
आगै भावी जो कथा
सो जानै भगवंत ॥ ६६३ ॥

अशाप्रकारें आपल्या पंचावन्न वर्षांची कथा सांगून पुढील पंचावन्न वर्षांची कथा परमेश्वराला ठाऊक, असें बनारसी म्हणतो. कारण त्याच्या मताप्रमाणें मनुष्याचें आयुष्य एकशेंदहा वर्षांचें आहे. सं. १६९८ मध्यें

नगर आगरेमै बसै जैनधर्म श्रीमाल,
बानारसी बिहोलिआ
अध्यातमी रसाल. ॥ ६७१ ॥
ताके मन आई यहु बात

आपनु चरित कहौं बिख्यात. ॥ पण हें अर्ध्या आयुष्याचें चित्र असल्यानें, बनारसीनें याला 'अरध-कथानक' किंवा 'अर्ध-कथानक' (वा अर्धें चरित्र) असें नांव दिलें आहे.

## 'हिंदुस्थानी 'चें पूर्व स्वरूप

भाषेच्या दृष्टीनें ह्या ग्रंथाचें एक विशेष महत्त्व लक्षांत घेण्यासारखें आहे. पांडित्याच्या बाजूनें त्याचा विचार करावयाचा, तो या ग्रंथांत प्रो. हिरालाल जैन यांनीं जसा केला आहे, त्याचप्रमाणें इतर तज्ज्ञ पंडितांनीं केला आहे. परंतु आम्हांला जो त्याचा विशेष येथें दाखवावयाचा आहे, तो तशा प्रकारचा नाहीं. आजच्या सामान्य वाचकाच्या दृष्टीनेंच आम्हांस ह्या मुद्याचें विवेचन करणें आहे. प्रांताप्रांतांतून मराठी, बंगाली वगैरे प्रांतिक भाषा हल्लीं उत्तम प्रकारें वाढीस लागल्या आहेत. तथापि ज्यांचे संबंध एकमेकांशीं अत्यंत निगडित आहेत, अशा हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांना मिळून एक आंतरप्रांतीय भाषिक माध्यम असणेंहि आवश्यक आहे, हें आतां बहुतेक सर्वांनीं मान्य केलें आहे. तथापि या माध्यमाच्या स्वरूपाविषयीं पुष्कळच तीव्र मतभेद आणि वादविवाद चालू आहेत. या वादविवादांत आमच्यामतें एका मुद्याकडे, जितकें द्यावें, तितकें लक्ष दिलें जात नाहीं. तो मुद्दा म्हटला म्हणजे, इंग्रजी सत्ता येथें स्थापन होण्यापूर्वींच्या काळीं, हिंदुस्थानांत आंतरप्रांतिय व्यवहाराची परिस्थिति काय होती, आणि स्थूल मानानें ज्याला आंतरप्रांतीय भाषिक माध्यम ही पदवी देतां येईल असें एकादें माध्यम होतें किंवा नाहीं, हा तो मुद्दा होय. थोडा विचार केला असतां हें ध्यानांत येईल कीं, अगदीं आसेतुहिमाचल नसलें, तरी त्यावेळच्या परिस्थितींत पुरेशी प्रमाणांत अशाप्रकारचें माध्यम असल्याशिवाय त्यावेळीं होत असलेला पुष्कळसा व्यवहार घडून येणें अशक्य होतें. येथें ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, आंतरप्रांतीय व्यवहारव्यापारामध्यें ज्यांना नित्यशः भाग घ्यावा लागे, असे लोक त्याकाळीं अनेक प्रांतिक बोलींत आपला चालता व्यवहार करण्याची पात्रता अनुभवानें संपादन करीत असत. याचें प्रत्यंतर नासिक, प्रयाग वगैरे ठिकाणांच्या तीर्थोपाध्यायांच्या व्यवहाराचें अवलोकन केलें असतां आजहि समजून येईल. वर सांगितलेला पर्याय ध्यानांत घेऊनहि थोडा अधिक विचार केल्यास अशीहि खात्री पटेल कीं, आंतरप्रांतिय भाषिक माध्यम असें वर्णन जिचें सार्थपणें करतां येईल,












अशा एका भाषेची स्थूल रेषा हिंदुस्थानच्या हस्त-कमलावर, पुसट पुसट का होईना आणि तुटक तुटक का होईना, उमटलेली आढळेल. ही रेषा, ज्याला बनारसीनें मध्यदेश म्हटलें आहे, तेथें साहजिकपणेंच अधिक ठळकपणें उमटलेली आढळली तर त्यांत आश्चर्य नाहीं. प्रो. हिरालाल जैन यांच्या मतें, " बनारसदासजीका क्रीडाक्षेत्र प्रायः आगरासे जौनपुरतक यू.पी.का प्रदेश रहा है। अतएव इसेही उनके द्वारा सूचित मध्यदेश माना जा सकता है।" परंतु बनारसी ह्यानें आपल्या अर्धकथानकांत, तक्त जोनपूर किंवा शरकी सलतनच्या ज्या हद्दी दिल्या आहेत ( चौपइ ३५, ३६ ), त्यांत पटण्याचा निर्देश आहे. अर्थात् आजच्या बिहारचा भागहि बनारसीच्या मध्यदेशांत अपेक्षित मानण्यांत वावगें कांहीं नाहीं. याच विभागांत हिंदूंची त्रिस्थळी मोडते. हाच विभाग अनेक दृष्टींनीं उत्तर हिंदुस्थानचा मध्य किंवा गाभा मानणें युक्त आहे व तेथलीच मिश्रभाषा आजहि सर्वसामान्यपणें आंतरप्रांतीय भाषिक माध्यमाची पदवी शोभवूं शकते. प्रो. हॉडसन यानें आपल्या India Census Ethnograhhy (१९०१ ते १९३१) ह्या ग्रंथांत पृष्ठ २५ वर जें विवेचन केलें आहे, तेंहि ह्या ठिकाणीं लक्षांत घेण्यासारखें आहे. हीच मध्यदेशाची बोली मोंगल साम्राज्याच्या काळीं हिंदुस्थानांत हिंदुस्तानीच्या रूपांत परिणत झाली. बनारसीनें आपला ग्रंथ 'हिंदुस्थानी 'च्या ह्या पूर्व स्वरूपांतच लिहिला म्हटलें तरी चालेल. अर्थात् बनारसीच्या ह्या ग्रंथांत मुसलमानी शब्द जागजागीं मोकळेपणानें वापरलेले आढळतात. ते इतके विपुल आहेत कीं, त्यांची निराळी यादी देण्याचें विशेष प्रयोजन नाहीं. येथें एवढेंच लक्षांत आणून द्यावयाचें आहे कीं, आज राष्ट्रभाषेचा विचार करणाऱ्या मंडळींनीं बनारसीच्या ह्या अर्धकथानकांतील भाषेचा विचार अवश्यमेव करावा. म्हणजे त्यांना पुष्कळ उद्बोधक विचार सुचतील आणि त्यांच्या आग्रहांना मुरड पडेल. बनारसीनें केलेली रचना आजच्या सुबुद्ध वाचकाला सहजासहजीं कळूं शकेल इतकी सोपी झाली आहे, या गोष्टीचें पुनः पुनः कौतुक वाटल्याशिवाय राहवत नाहीं. प्रो. हिरालाल जैन यांनीं बनारसीच्या भाषेसंबंधीं जो निष्कर्ष काढला आहे, तो येथें उतरून घेऊन हा विषय संपवूं. ते म्हणतात, " अर्ध-कथानकमें उर्दू फारसी के शब्द काफी तादादमें आये हैं, और अनेक मुहावरे तो आधुनिक खड़ी बोलीके कहे जा सकते हैं, इसपरसे यह निष्कर्ष निकाला जा सकता है कि, बनारसीदासजीने अर्धकथानककी भाषामें व्रजभाषाकी भूमिका लेकर उसपर मुगल कालमें बढते हुए प्रभाववाली खड़ी बोली की पुट दी है. और इसेही उन्होंने 'मध्यदेशकी बोली' कहा है, जिससे ज्ञात होता है कि यह निश्चित भाषा उस समय मध्यदेशमें काफी प्रचलित हो चुकी थी. इस प्रकार 'अर्ध-कथानक' भाषाकी दृष्टि से खड़ी बोली के आदिम कालका एक अच्छा उदाहरण है."

---

[ '**रामराम**'— ( नवभारत वर्ष १ अंक १ पृ. २१ ) बनारस ते अलाहाबाद गाडीसडकेनें प्रवास करीत असतांना तिकडलि कित्येक खेडूत मंडळींत एकमेकांना 'रामराम' करण्याची पद्धति दृष्टिस पडली. आपल्या इकडे 'रामराम' करण्याची पद्धति रामदासांनीं रूढ केल्याचा प्रवाद आहे. परंतु चंद्रराव मोरे याच्या एका पत्रांत 'रामराम' लिहिल्याचा पुरावा कै. रा. ब. साने यांनीं भा. इ. सं. मंडळासमोर अस्सल पत्र पुढें ठेवून दाखल केला होता. नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या 'राजस्थान-भारती' या 'श्रीसादूल राजस्थानी रिसर्च इन्स्टिट्यूट' च्या जुलाई-आक्टोबर १९४६ च्या युग्मांकांत 'वात सयाणी चारणीरी' नांवाचें प्रकरण छापण्यांत आलें आहे. त्यांत पृ. ८१ वर पुढील उल्लेख आढळला:—

'ताहरां वीजाणंद रै डेरै सयणी आयी। वीजाणंद साम्हौ आयौ। आइनै **रामराम कियौ**। वजिाणंदानें सामोरे येऊन सयणीस रामराम केला', असें म्हटलें आहे. सयणी स्त्री आहे हेंहि आणखी ध्यानांत घेण्यासारखें आहे. ही सयणी-कथा केव्हां रचली असेल ती असो. परंतु तींत अल्लाउद्दिन पातशहाची पातशाही चालू आहे असें म्हटलें आहे. (द. वा. पो.) ]









# कै. दे. भ. तात्यासाहेब केळकर

आचार्य शं. द. जावडेकर

गेल्या महिन्याच्या १४ तारखेस पुणें मुक्कामीं महाराष्ट्राचे एक राजकीय पुढारी आणि लो. टिळकांचे अनुयायी दे. भ. तात्यासाहेब केळकर यांचें आपल्या घरीं अगदीं अचानक व अनपेक्षितपणें पहांटे ५ वाजतां कोणासही न कळतां एकाएकीं देहावसान झालें. ही बातमी ऐकून सर्व महाराष्ट्राचें अंतःकरण शोकानें विव्हल व्हावें, इतका त्यांचा महाराष्ट्राशीं दीर्घकाल अत्यंत स्नेहाचा परिचय घडलेला होता. लो. टिळकांच्या हयातींत आणि त्यांच्या निधनानंतर तात्यासाहेबांनीं केसरीची सेवा प्रत्यक्ष अशी सुमारें ४० वर्षें केली. त्यानंतर अलीकडे १०–१२ वर्षें ते केसरीच्या सेवेंतून निवृत्त होऊन इतर वाङ्मयकार्यांत निमग्न झाले होते. तरीही प्रचलित राष्ट्रीय राजकारणांत कोणतेंही महत्त्वाचें आंदोलन झालें कीं ते आपलें स्वतःचें मत निर्भीडपणें प्रकट करीत आणि महाराष्ट्रांतील जनता व सुशिक्षित वर्ग प्रत्येक नव्या घडामोडीसंबंधीं त्यांचा अभिप्राय ऐकून घेण्यास उत्सुक व तत्पर असे. आज या महाराष्ट्रीय जनतेला व या सुशिक्षित वर्गाला तात्यासाहेबांच्या निधनामुळें चुकल्याचुकल्यासारखें वाटूं लागलें आहे. तात्यासाहेबांचें वय मरणसमयीं ७६ वर्षांचें होतें. त्यांच्या बुद्धीची तरतरी कायम असली तरी सार्वजनिक व विशेषतः राजकीय नेतृत्व करण्याची उमेद त्यांना आतां उरलेली नव्हती. ४०–५० वर्षें राष्ट्रसेवेला अर्पण करून आतां उरलेला काळ राजकारणनिवृत्तींत आणि आपणांस अत्यंत प्रिय असणाऱ्या वाङ्मयरसाचा आस्वाद घेण्यांत घालवावा अशीच त्यांची वृत्ति बनलेली होती. तथापि राजकारण असो, समाजकारण असो, साहित्य-संमेलन अथवा नाट्य-संमेलन असो, वाङ्मय–व्यवसाय असोत किंवा धर्मशास्त्र–वेदांत–तत्त्वज्ञान यांसारखे विषय असोत, प्रत्येकासंबंधीं तात्यासाहेबांचें मत काय आहे तें समजून घेऊन त्याची साधकबाधक चर्चा करण्याचा छंदच जणूं कांहीं गेलीं २५–३० वर्षें महाराष्ट्राला लागला होता. त्या महाराष्ट्राला आज तात्यासाहेबांचें निधन शोकावह व क्लेशप्रद वाटावें हें अगदीं साहजिक आहे.

## राजकीय कामगिरी व नेतृत्व

इ. स. १८९५ च्या सुमारास तात्यासाहेब केळकर साताऱ्याहून वकिलीचा धंदा सोडून लो. टिळक यांच्याकडे संपादक म्हणून आले. या वेळेपासून लोकमान्यांच्या हयातीपर्यंत त्यांनीं त्यांचे अनुयायी म्हणून राजकीय कार्य आणि केसरी मराठ्याचें संपादन केलें. १८९८ सालीं लो. टिळकांना १॥ वर्ष बंदीवास घडला. त्या काळांत तात्यासाहेबांनीं केसरीची उत्तम प्रकारें जोपासना केली. यानंतर लो. टिळक सुटून आल्यापासून पुन्हा १९०८ सालीं तुरुंगांत जाईपर्यंतच्या काळांत दे. भ. काकासाहेब खाडिलकर आणि तात्यासाहेब केळकर या दोघांनीं अनुक्रमें केसरी व मराठा या पत्रांच्या संपादनकार्यांत मोठा भार उचलला. तात्यासाहेब केळकर आणि काकासाहेब खाडिलकर हे लोकमान्यांचे डावे उजवे हात होते, असें त्यावेळीं मानण्यांत येई. लोकमान्यांना आपल्या राजकारणांत या दोघांचाही उपयोग आहे असें वाटत असे. मंडालेच्या तुरुंगांत








असतांनाही या दोघांनीं सहकार्यानें व सलोख्यानें केसरी-मराठा संस्थेचें कार्य चालवावें, अशीच त्यांची उत्कंठा असल्याचें त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. पण लोकमान्यांच्या प्रत्यक्ष नेतृत्वाच्या अभावीं हें जोड-नेतृत्व टिकणें शक्य नव्हतें व टिकलें नाहीं. यानंतर केसरी-मराठ्याची सर्व जबाबदारी आपल्या एकट्याच्या खांद्यावर घेऊन ती तात्यासाहेबांनीं लो. टिळक सुटून परत येईपर्यंत एकट्यांनीच वाहिली. या त्यांच्या कामगिरीबद्दल लोकमान्यांनीं त्यांना धन्यवाद दिले आणि पुन्हां ते व काकासाहेब खाडिलकर या दोघांना आपल्या राजकारणाच्या रथास जुंपून नव्या परिस्थितीत नव्या धोरणानें कार्य सुरू केलें. लोकमान्यांच्या गैरहजेरींत राष्ट्रिय पक्षाची सरकारनें दाणादाण करून सोडली होती. ही परिस्थिति लक्षांत घेऊन टिळकांनीं आपल्या राजकारणास सौम्य स्वरूप दिलें आणि बॅ. बॅप्तिस्ता, डॉ. वेंझटप्रभृतींना पुढें करून स्वराज्याचा लढा फिरून सुरू केला. राष्ट्रसभा हस्तगत केली आणि राष्ट्रिय पक्षाच्या उग्र तेजाला भिऊन प्रागतिकांनीं राष्ट्रसभेचा निरोप घेण्यास सुरुवात केली. टिळकांचें यावेळचें धोरण वरून सौम्य दिसलें तरी त्यांच्या अंतःकरणांतील क्रांतीचा अग्नि प्रज्वलित होता. सरकारशीं युद्धसहकार करा असा प्रचार करण्यासाठीं त्यांनीं काढलेली मोहीम सरकारला धोक्याची वाटूं लागली आणि युद्धसहकार मिळविण्यासाठीं मुंबई सरकारनें भरविलेली पुढारी-परिषद टिळकांनीं हजर राहून उधळून लावली. टिळकांचें सरकारला मिळणारें सहकार्य अशा प्रकारें प्रखर व तेजस्वी असल्यामुळें 'आम्हाला तुमचें सहकार्य नको ', असें सांगण्याची पाळी सरकारवर आली. या काळांत तात्यासाहेब केळकर यांची सेवा लोकमान्यांना फार उपयुक्त झाली. स्वराज्याशिष्टाईसाठीं टिळक विलायतेस गेले, तेथेंही तात्यासाहेबांचा त्यांना फार उपयोग झाला. पण ही सर्व शिष्टाई विफल झाली. परत आल्यानंतर ज्या मॉंटेग्यू सुधारणा हातांत पडल्या, त्यांचें मूल्यमापन करतांना लोकमान्यांनीं " उजाडलें पण सूर्य कोठें आहे ? " या मथळ्याचा अग्रलेख लिहून आपलें मत व्यक्त केलें. पुढें त्यांनीं कॉंग्रेसमध्यें " कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्ष " या नांवाचा पक्ष स्थापन केला आणि कॉंग्रेसविषयीं अढळ निष्ठा व लोकशाहीवर दृढ विश्वास असें त्यांचें धोरण ठरवून दिलें. या पक्षाच्या धोरणासंबंधीं स्पष्टीकरण करतांना ते लिहितात, " राष्ट्रीयसभा हातांत पडलेल्याचा उपयोग करा म्हणून सांगत आहे. पण जें हातांत पडलें आहे, तें समाधानकारक नसून निराशाजनक आहे. पार्लमेंटसभेकडून पूर्ण स्वराज्याचे हक्क मिळेपर्यंत चळवळ करा अशी दिशा राष्ट्रीय सभेनें दाखविली आहे. या दिशेनें जात असतांना सर्व हिंदी राष्ट्राचें कल्याण व्हावें म्हणून आणि सर्व गोरगरीबांची उन्नति व्हावी म्हणून नोकरशाहीशीं कांहीं वेळां सहकारितेनें तर कांहीं वेळां विनसहकारितेनें वागावें लागेल. राष्ट्रीय सभेच्या सहकारितेच्या व विनसहकारितेच्या दोनही मार्गांनीं प्रसंगानुसार जाणारे तेच राष्ट्रीय सभेचे खरे भक्त होत......सर्व हिंदी राष्ट्राचें कल्याण कशांत आहे, याची कसोटी मुक्रर करण्याचें काम राष्ट्रसभेनें केलें आहे. " लोकमान्यांनीं राष्ट्रीय सभेनें व तिच्या भक्तांनीं प्रसंगानुसार सहकारितेनें व विनसहकारितेनें वागण्याचें जें धोरण आंखून दिलें, त्यावर नेमस्त पक्षाकडून आक्षेप येत. त्याला उत्तर देतांना ते म्हणत, " कोणी म्हणतील कीं अशा रीतीनें तुम्ही वागल्यास हल्लींच्या कायद्याची धूळधाण करण्याचें पाप तुम्ही आपल्या कपाळीं घ्याल. पण या मूर्खांस असें कळत नाहीं कीं, या कायद्यांतून जर पूर्ण स्वराज्याचा कायदा पुढें उत्पन्न करावयाचा आहे, तर याचें आयुष्य जितक्या लवकर संपेल तितकें आम्हांस इष्टच आहे. ज्याला पतंग व्हावयाचें आहे, तो फार दिवस सुरवंटाच्या स्थितींत कसा रहाणार ? म्हणून प्रस्तुत समयानुसार नवीं हत्यारें, नवीं माणसें निवडून लवकर पतंग होण्याच्या उद्योगास लागा आणि स्वराज्याच्या सुंदर उपवनांतील मधुर रसाचा लवकर आस्वाद घेण्याचा निश्चय करा. पूर्वीच्या सुरवंटाच्या शरीराच्या लोभानें फसून जावूं नका, एवढेंच लोकांस आमचें आग्रहाचें सांगणें आहे. " लो. टिळकांचा केसरींतील हा अखेरचाच लेख होय. हा लेख ता. २० एप्रिल १९२० रोजीं प्रसिद्ध झाला आणि पुढें १ ऑगस्ट रोजीं लोकमान्यांचें देहावसान झालें !

यानंतर लोकमान्यांचें संकल्पित धोरण अंमलांत आणून संपूर्ण स्वराज्याची प्राप्ति करून घेण्याचें

कार्य काँग्रेसनिष्ठ लोकशाही पक्षाकडे आलें. हें कार्य करीत असतां काँग्रेसनिष्ठेस जागून तिच्या आज्ञेप्रमाणें कधीं सहकारितेनें व कधीं विनसहकारितेनें लढा चालवावयाचा आणि स्वातंत्र्याचें शिखर गांठावयाचें. आज हें कार्य पूर्ण झालेलें आहे आणि तें पुरें करण्याचें श्रेय राष्ट्रसभेनें प्राप्त करून घेतलें आहे, हें कै. तात्यासाहेब केळकर यांनीं पाहिलें व तें त्यांनीं आपल्या उदार आणि मार्मिक बुद्धीनें प्रांजलपणें कबूल केलें.

सप्टेंबर १९४६ च्या सह्याद्रीच्या अंकांत ते या विषयासंबंधीं म्हणतात, "तथापि हिंदी राजकारणाच्या धक्काधक्कीत काँग्रेसनें हें असामान्य यश मिळविलें, हें मान्य केलेंच पाहिजे. फारतर हें लक्षांत घेऊन उद्यां यथाकाल काँग्रेसचा पाडाव करण्याकरितां इतर पक्षांनीं अधिक जोरानें कंबर कसावी आणि एकजूट करावी असें म्हणावें व त्या मार्गानें निश्चयानें कामाला लागावें. तथापि क्रिकेटच्या खेळांतला डाव ज्यानें जिंकला, त्या संघप्रमुखाचें अभिनंदन करण्याकरितां हात पुढें करण्याला हार खाल्लेल्या पक्षाच्या प्रमुखाला वाईट वाटत नाहीं... त्याच न्यायानें व तितक्या अर्थानें कां होईना पण आज इतर सर्व पक्षांकडून अभिनंदन केलें जाण्याला काँग्रेस ही पात्र आहे असें मला म्हणावेंसें वाटतें. (१) आज सुमारें २७ वर्षें गांधीजींना काँग्रेसचें पुढारीपणच नव्हे तर तिजवर गुरुशिष्याच्या नात्यानें वर्चस्व टिकवितां आलें. (२) काँग्रेसपक्षाच्या केन्द्रस्थानीं वावरणाऱ्या बुद्धिमान् देशभक्तांना आपली एकजूट राखता आली. हिन्दुस्थानांतल्या फुटीर वृत्तीच्या दृष्टीनें ही गोष्ट विशेष ध्यानांत घेण्यासारखी नव्हे कां ? (३) आणि चुका करीत करीत कां होईना पण काँग्रेसनें शर्यतीच्या मैदानांत धावून शेवटीं जयस्तंभाशीं सर्वांच्या पुढें मान काढली, ही गोष्ट तिला भूषणास्पद व प्रतिपक्षांना बोधप्रद (!) ठरेल यांत शंका नाहीं. यांत कांग्रेसपुढाऱ्यांच्या शहाणपणाचा किंवा गांधींच्या अनुयायांच्या भोळसट वृत्तीचा विजय असो. परंतु राजकीय चळवळ करणारा एक नामांकित पक्ष म्हणून गांधी व गांधीप्रणीत काँग्रेस यांनीं बाहेरच्या सर्व जगावर छाप पाडली यांत शंका नाहीं. आणि याकरितां तरी त्यांचें अभिनंदन अवश्य केलें पाहिजे. सूक्तासूक्त कोणत्याही साधनांनीं कां होईना पण पक्षसंघटनेचें कर्तृत्व काँग्रेस पक्षानें प्रदर्शित केलें यांत शंका नाहीं."

लो. टिळकांच्या निधनानंतर गेल्या २७ वर्षांत स्वराज्यप्राप्तीसाठीं जो राजकीय लढा या देशांतील जनतेनें, काँग्रेस व म. गांधी यांनीं, ब्रिटिशांविरुद्ध दिला, त्यासंबंधीं तात्यासाहेब केळकर यांनीं निर्विकार व उदार बुद्धीनें वर जो अभिप्राय प्रकट केला आहे, त्यावरून त्यांची राजकीय पक्षांशीं विरोध करीत असतांही खेळकर वृत्ति कशी असे, हें उत्कृष्टपणें दिसून येतें. लोकमान्यांच्या हयातींत त्यांनीं अखेरपर्यंत राष्ट्रीय पक्षाशीं साथ केली, तरीही नेमस्त पक्षाबद्दल आपली औदार्यबुद्धि लोपूं दिली नाहीं. पुढें पुढें काँग्रेस व म. गांधी यांच्या राजकारणाशीं त्यांचा इतका विरोध वाढला कीं, त्यांना ही निर्विकार बुद्धि सतत ठेवतां आली नाहीं. तथापि स्वराज्य प्राप्त झाल्यानंतर त्यांनीं आपल्या स्वाभाविक खेळकर वृत्तीस अनुसरून काँग्रेसपक्षाचें वरीलप्रमाणें अभिनंदन केलें हें त्यांचें वैशिष्ट्य होय. कोणत्याही गोष्टींतील एकांतिकपणा हा त्यांना स्वभावतःच खपत नसे. मग ही एकांतिक वृत्ति लो. टिळक किंवा म. गांधी यांसारख्या असामान्य विभूती दाखवोत किंवा त्यांचे सामान्य अनुयायी दाखवोत.

## नवें मन्वंतर

१९२० सालापासून हिंदी राजकारणांत, तसेंच जगाच्या इतिहासांत एक नवें युग निर्माण झालें. पहिल्या जागतिक महायुद्धापूर्वीं सर्व जगभर व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक समता, लोकशाही आणि राष्ट्रीय स्वयंनिर्णय हीं ध्येयें फैलावूं लागलीं होतीं. तथापि त्या महायुद्धाच्या काळांत या सर्व ध्येयांत अथवा त्यांना प्राप्त झालेल्या विशिष्ट आकारांत कांहींतरी दोष आहे, याची जाणीव होऊन समाजाच्या निष्ठांत फेरबदल करण्याची आवश्यकता भासूं लागली. पहिल्या महायुद्धानंतर ज्या पक्षांचा विजय झाला, त्यानें युरोपांत एक राष्ट्रसंघ स्थापन करून वरील ध्येयें मूर्त स्वरूपांत आणण्याची घोषणा केली. पण या घोषणेंत व त्या-








नंतर स्थापन केलेल्या नव्या जगाच्या रचनेंत ब्रिटिश, फ्रेंच व अमेरिकन भांडवलशाही राष्ट्रांनीं आपली साम्राज्यलालसा तृप्त करण्याचा कावा साधून घेतला, अशी हाकाटी सर्व जगभर झाली. रशियांत एक अश्रुतपूर्व, अपूर्व क्रांति बोल्शेविकांनीं करून तिचा फैलाव सर्व जगभर करण्याची घोषणा केली. भांडवलदार लोकशाहींची इभ्रत जगांत उरली नाहीं. आणि सर्वच सामाजिक तत्त्वज्ञानांत नव्या निष्ठांचा स्वीकार करण्याचा काळ प्राप्त झाला. हिंदुस्थानांत ज. डायरनें जालियनवाला बागेंत गोळीबार करून ब्रिटिशांच्या राज्याचें राक्षसी स्वरूप जगापुढें मांडलें आणि अशा सैतानी सत्तेशीं झगडण्याला कायदेशीर व सनदशीर पद्धती पुऱ्या पडणार नाहींत, ही गोष्ट हिंदी जनतेच्या व तिच्या नेत्यांच्या अंतःकरणावर पूर्णपणें बिंबली गेली. या वेळीं हिंदी राजकारणाची धुरा उचलण्यास म. गांधी पुढें आले. आणि त्यांनीं आपला सत्याग्रहाचा मार्ग हिंदी जनतेपुढें व जगापुढें मांडला. अशा रीतीनें जगांत समाजवाद आणि हिंदुस्थानांत सत्याग्रह अशा दोन नव्या निष्ठा यावेळीं निर्माण झाल्या. यांपैकीं कोणत्याही एका अथवा दोन्हीं निष्ठांचें तात्त्विक आकलन करून हिंदी राजकारणांत त्यांना कोणतें स्थान प्राप्त होणार, याचा तात्त्विक निर्णय करणें लोकमान्यांच्या नंतर ज्यांनीं हिंदी राजकारणाची धुरा उचलण्याचें ठरविलें, त्यांनीं करावयास हवा होता. पण इतक्या खोल दृष्टीनें त्या वेळच्या जुन्या पिढींतील लोकांनीं असा विचार केला नाहीं. महाराष्ट्रांतील बुद्धिमंतांचें नेतृत्व करून जनतेला मार्गदर्शन करण्याची जबाबदारी त्यावेळीं तात्यासाहेब केळकर यांच्यावर येऊन पडली होती. नव्या पिढींतील तरुणांना भारून टाकणाऱ्या वरील दोन नव्या निष्ठा महाराष्ट्रांतही या वेळेपासून प्रविष्ट झाल्या व तें अपरिहार्यच होतें. याच दोन निष्ठा पुढें वाढत जाऊन गांधी व नेहरू यांच्या जयजयकाराच्या रूपानें महाराष्ट्रीय जनतेच्या अंतःकरणांत त्या बद्धमूल झाल्या आणि महाराष्ट्रांतील तरुण क्रांतिकारक अंतःकरणें व सामान्य जनता गांधी-नेहरूंच्या प्रभावानें काँग्रेसकडे खेचली गेली. तरी महाराष्ट्रांतील बुद्धिजीवी वर्गावर तात्यासाहेब केळकर यांच्या लालित्यपूर्ण कुशल लेखणीची मोहिनी कायम होती. पण या वर्गालाही अखेरीअखेरीस तात्यासाहेब हे साहित्यसम्राट् आहेत, एवढें म्हणूनच त्यांच्याविषयींची आपली पूज्य बुद्धि व्यक्त करावी लागत असे. थोडक्यांत सांगावयाचें तर या नव्या मन्वंतरांतील राजकीय प्रवाहांचें आलोडन करून महाराष्ट्रीय जनतेचें मार्गदर्शन करण्याचें कार्य तात्यासाहेबांच्या अमदानींत केसरीला करतां आलें नाहीं. हें खरें असलें तरी ते स्वतः केसरीचें संपादन करीत असत, तोंपर्यंत त्यांनीं चालू राजकारणासंबंधीं केलेली मार्मिक चिकित्सा समजून घ्यावी आणि त्यांचें त्यासंबंधींचें भाष्य वाचावें, हा महाराष्ट्रांतील जनतेला लागलेला छंद केव्हांच सुटला नाहीं व त्यांत तिला कधींही विरस वाटला नाहीं.

## साहित्यक्षेत्रांतील नवी दृष्टि

तात्यासाहेब केळकर यांचा मुख्य व्यवसाय जरी केसरीचे संपादक या दृष्टीनें प्रचलित राजकारणाचें विवेचन हा असला तरी त्यांचें साहित्यक्षेत्रांतील कार्य अधिक महत्त्वाचें आहे, असें आज बहुतेक लोक मानतात. केसरीच्या स्थापनेपासून चिपळूणकर, आगरकर, टिळक, खाडिलकर व केळकर या पांच संपादकांनीं त्यावर आपला वैयक्तिक ठसा उमटविलेला आहे. यांपैकीं प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य भिन्न आहे. तात्यासाहेबांनीं केसरीच्या संपादकीय लेखावर आपल्या बहुविध विद्वत्तेची व मार्मिक सूक्ष्म विवेचनाची छाप पाडली. त्यांत त्यांचे साहित्यगुणच विशेषत्वानें प्रकट झाले आहेत. चिपळूणकर, आगरकर व टिळक हे विशिष्ट जीवननिष्ठांनीं भारलेले लेखक असून आपली जीवननिष्ठा आपल्या ओजस्वी लेखणीनें जनतेंत निर्माण करणें, हें ते आपलें साध्य समजत. लेखाची विशिष्ट सजावट आणि त्यांतील युक्तिवाद हीं त्यांचीं साधनें होत. चिपळूकर व आगरकर यांच्या लेखनांतील साहित्यगुणांना साध्याचें स्थान केव्हांच प्राप्त झालें नाहीं. सार्वजनिक कार्यास प्रारंभ केल्यापासून तों त्याची अखेर होईपर्यंत त्यांनीं जें जें लेखन केलें त्या लेखनांतील प्रत्येक विभागावर त्यांच्या जीवननिष्ठेची छाप उठलेली आपणांस दिसेल. अशा प्रकारच्या विशिष्ट निष्ठेचा प्रचार करणें हें केळकरांच्या लेखनाचें साध्य नव्हतें. हातीं घेतलेला लेख आणि त्यावेळीं










## कै. दे. भ. तात्यासाहेब केळकर

पुरस्कारिलेला पक्ष यांची उपमादृष्टांतादि अनेक अलंकारांनीं सजावट करून उठाव करणें आणि युक्तिवादाचीं शस्त्रास्त्रें सोडून प्रतिपक्षाचा मर्मच्छेद करणें, यांत त्यांचा हातखंडा होता व त्यांतच त्यांना गोडी वाटे. प्रतिपक्षाचे युक्तिवाद समजून घेणें, त्यांचें खंडन करणें आणि त्याच्यावर आपल्या पक्षास पोषक अशा युक्तिवादांचा मारा करणें, हें कार्य ते सहज लीलेनें आणि प्रासादिक पद्धतीनें करीत. त्यांच्या भाषाशैलींत रूक्षता नसे व नित्याच्या परिचयांतील उपमा दृष्टांतांनीं ती सजवलेली असे.

आज मराठी साहित्यक्षेत्रांत चालू असलेले बरेचसे वाद त्यांच्यापासूनच उगम पावलेले आहेत, असें म्हणण्यास फारसा प्रत्यवाय नाहीं. बडोदा येथील साहित्यसंमेलनांतील त्यांचें भाषण बरेंच प्रासिद्धि पावलेलें आहे. ललित वाङ्मयांत बोधगर्भता अथवा बोध करण्याचा हेतु असलाच पाहिजे किंवा काय, किंवा नेहमींच तो दिसून येतो किंवा काय, यासंबंधीं त्यांनीं आपल्या भाषणांत विवेचन केलें असून प्रत्येक ललित-वाङ्मयकृतीच्या पाठीमागें हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून देणें योग्य नाहीं, असें आपलें मत प्रदर्शित केलें आहे. याच्याच आधारें पुढें कला आणि जीवन, कला आणि नीति यांचे परस्पर संबंध कोणते असावेत किंवा कोणते असतात हे वाद उपस्थित झाले आणि त्या चर्चेमुळें मराठी टीकावाङ्मयांत महत्त्वाची भर पडत गेली. याच त्यांच्या भाषणांत वाङ्मयापासून मिळणाऱ्या आनंदाची मीमांसा करून काव्यानंदामुळें प्राप्त होणारी समाधि ही निर्विकल्प नसून सविकल्प असते, असा एक सिद्धांत त्यांनीं मांडला. यानंतर काव्यानंदासंबंधीं अनेकांनीं आपापलीं मतें व उपपत्ती मांडतांना तात्यासाहेबांच्या या सिद्धांताचें समर्थन अथवा खंडन केलेलें दिसून येतें. काव्यामध्यें रसाला कोणतें स्थान आहे, अलंकारांना कोणतें आहे, बोधप्रधान वाङ्मय व रसप्रधान वाङ्मय यांत कोणाला श्रेष्ठत्व आहे, इत्यादि वाङ्मयविषयक वादांचा उगम या भाषणानंतर झालेला असून त्यांतूनच पुढें वाङ्मयाचा आस्वाद घेणाऱ्याची वृत्ति ताटस्थ्याची असते कीं तादात्म्याची असते, म्हणजे वाचक अथवा प्रेक्षक काव्यविषयांतील निरनिराळ्या भूमिकांसंबंधीं तटस्थ राहून त्यांचें निरीक्षण करीत असतो कीं त्यांच्याशीं तादात्म्य पावत असतो, असेही प्रश्न पुढें चर्चिले जाऊं लागले. अशा रीतीनें वाङ्मयानंदासंबंधींच्या निरनिराळ्या तात्त्विक उपपत्ती आधुनिक मराठी साहित्यांत पुढें येण्यास श्री. केळकर हे बऱ्याच अंशानें कारण झाले असून यांपैकीं प्रत्येक वादासंबंधीं त्यांचें मत समजून घेण्यास साहित्यक्षेत्रांतील लेखक नेहमीं उत्सुक असत. महाराष्ट्रांतील आधुनिक साहित्यभक्तांवर तात्यासाहेबांचा बराच प्रभाव पडल्याचें दिसून येईल. या सर्व विषयांत तात्यासाहेबांच्याहून अधिक खोल दृष्टीनें तत्त्वविवेचन करणारे साहित्यिक म्हणजे कै. वामन मल्हार जोशी हेच होत. तात्यासाहेब अलंकारांना जितकें महत्त्व देत, तितकें वामनराव जोशी देत नसत. नीति व कला यासंबंधींही त्यांचीं मतें तात्यासाहेबांच्या मतांहून अधिक निःसंदिग्ध वाटतात. तथापि गेल्या २५–३० वर्षांत मराठी साहित्यांत निर्माण झालेल्या या निरनिराळ्या वादांचा अद्यापि खरा शास्त्रीय निर्णय झालेला आहे किंबहुना त्या निरनिराळ्या वादांना खरी शास्त्रीय भूमिका अद्यापि कोणी दिलेली आहे, असेंही म्हणतां येत नाहीं. काव्यानंदासंबंधीं तात्यासाहेब केळकर यांचें भाषण बरेंच प्रसिद्धि पावलें असलें, तरी तत्पूर्वी आगरकरांनींही एक मार्मिक लेखमाला पूर्वी केसरींत लिहिलेली होती. तेथपासूनच या विषयाच्या आधुनिक चर्चेचा उगम झाला असें म्हणावें लागतें. ललित वाङ्मयाकडे बोधदृष्टीनें न पहातां केवळ एक क्रीडा अथवा करमणूक एवढ्या दृष्टीनें पहावें, या दृष्टीचा प्रथम पुरस्कार केळकरांनीं केला असें म्हणण्यास हरकत नाहीं. तसेंच काव्यांतील गूढगुंजन ही एक हीन प्रवृत्ति आहे असें मानण्याची जी एक अलीकडे वृत्ति दिसून येते, तिचाहि उगम त्यांच्यापर्यंत जाऊन पोहोंचूं शकेल. काव्यांतून एखादा आत्मसाक्षात्काराचा अथवा क्रांतीचा संदेश मिळावा, या गुणापेक्षां त्याच्या योगानें करमणूक व्हावी ही दृष्टि आली म्हणजे ओज आणि रस यांच्यापेक्षां अर्थचमत्कृति, कल्पनाविलास आणि शब्दलालित्य यांना अधिक महत्त्व प्राप्त होणें साहजिकच आहे.

### बुद्धिवादी केळकर

तात्यासाहेब केळकर हे स्वतःला बुद्धिवादी म्हणवीत असत पण त्यांचा बुद्धिवाद आणि आगर-








करांचा बुद्धिवाद यांत कोणत्याही प्रकारचें साम्य नव्हतें. आगरकरांच्या जीवनांत बुद्धिवाद ही एक जीवननिष्ठा होती. कोणत्याही विषयांत बुद्धीला पटेल तेंच सत्य मानावयाचें, बुद्धीला जें आकलन करतां येणार नाहीं, तें अज्ञेय आहे, असें उघडपणें प्रतिपादून आपल्या बुद्धीला जीं सत्यें निःशंकपणें पटलीं, त्यांच्या प्रचारासाठीं व प्रस्थापनेसाठीं सर्वस्वाचा होम करावयाचा, अशा प्रकारची प्रखर ध्येयनिष्ठा आगरकरांनीं आजन्म उपदेशिली आणि आचरिली. या बुद्धिवादी दीक्षेसाठीं ते संन्यासी बनले होते. या संन्यासांत व सत्यनिष्ठेच्या दीक्षेंत त्यांना जीवनांतला खरा आनंद आस्वादतां येत होता. ते वीर होते व वीरपूजक होते. तात्यासाहेब केळकर यांचा बुद्धिवाद याहून भिन्न होता. टिळकांच्यासारखे किंवा गांधींच्यासारखे असामान्य लोकनायक आपल्या अंतःप्रेरणेच्या अधीन झाले असतां कित्येक वेळां एकांतिक भाषा बोलतात अथवा एकांतिक धोरण पुरस्कारितात. अशा वेळीं त्यांची एकांतिकता अथवा त्यांच्या धोरणांतील अव्यवहार्यता त्यांना दाखवून देणें, सामान्य मनुष्याच्या मर्यादा ओळखून त्या धोरणास व्यवहार्यतेच्या दृष्टीनें थोडी फार मुरड घालणें, हें कार्य करणारी बुद्धि राजकारणांत आवश्यक असते. अशा प्रकारची बुद्धि तात्यासाहेबांच्यापाशीं होती. कोणत्याही असामान्य नेत्यानें लोकांपुढें मांडलेल्या लढाऊ कार्यक्रमांतील व क्रांतिकारक धोरणांतील व्यवहार्य–अव्यवहार्यतेचा विवेक करतांना लागणारी बुद्धि आणि सामान्य मनुष्यास न झेंपणाऱ्या गोष्टींचें निर्भीड विवेचन करण्यास लागणारें एक मानासिक धैर्य त्यांच्यामध्यें होतें. अशा विवेचक बुद्धीसच ते बुद्धिवाद असें म्हणत असत. त्यांच्या सर्व लेखनांत अशा प्रकारची विवेचक बुद्धि आढळून येते. टिळकांच्यासारखा क्रांतिकारक वीर नेता असला म्हणजे त्याला अशा सल्लागाराचा पुष्कळ उपयोग होऊं शकतो व तसा तो टिळकांच्या हयातींत टिळकांना व महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाला केळकरांच्यापासून झालेला आहे, याबद्दल महाराष्ट्रानें त्यांचें ऋणी असलें पाहिजे. गांधीयुगांत प्रथमतः वर्षभर त्यांनीं केसरींतून असहकारितापक्षास पाठिंबा देऊन त्या धोरणांतील तपशिलावर टीका करण्याचें कार्य केलें. तेव्हांहि त्यांच्या या बुद्धिवादाचा उपयोग अनेकांना झालेला आहे. टिळकांच्या मृत्यूनंतर जो नवा मनु देशांत सुरू झाला, त्याचें मुख्य लक्षण असहकारिता हेंच होतें. राष्ट्रसभेनें मॉंटफर्ड–सुधारणांच्या अमदानींत कौन्सिलप्रवेश स्वीकारला, तरी तो आंत जाऊन मंत्रिपदाशीं असहकार करण्याच्या वृत्तीनेंच स्वीकारला होता. हें धोरण पूर्ण प्रांतिक स्वराज्य मिळेपर्यंत कायम होतें.

तात्यासाहेबांनीं कौन्सिलप्रवेशानंतर मंत्रिमंडळाचा स्वीकार करावा, या धोरणाचा जो पुरस्कार केला, त्या संबंधीं पं. मोतीलाल नेहरूंचा व त्यांचा बेबनाव झाला. तात्यासाहेबांनीं प्रथम प्रतियोगी सहकारी पक्ष स्थापन केला व नंतर लोकशाही स्वराज्यपक्ष स्थापन करून ते कॉंग्रेसच्या बाहेर पडले. टिळकांच्या कॉंग्रेसनिष्ठ लोकशाहीपक्षाची परंपरा त्यांनीं यावेळीं सोडून दिली. यानंतर प्रांतिक स्वराज्य प्राप्त झालें व राष्ट्रसभेनें बदललेल्या परिस्थितीस अनुसरून प्रांतिक मंत्रिमंडळांचा स्वीकार केला आणि मध्यसरकारांत विरोधाचें व घटनाभंगाचें धोरण स्वीकारलें. यावेळीं तात्यासाहेबांच्या मनांत राष्ट्रसभेशीं असलेला आपला विरोध मिटवून तिच्याशीं एकी करावी असें होतें. परंतु जातीय निवाडा फेटाळून लावणें, या गौण मुद्यालाच प्रधान स्थान द्यावें आणि हिंदुसभेला राष्ट्रसभेची प्रतिस्पर्धी राजकीय संस्था बनवावी, या केवळ भावनावश राजकारणाच्या विचारधारेंत कै. तात्यासाहेब केळकर गोंविले गेले. या विचारप्रवाहांत एकदां सांपडल्यानंतर त्यांचें नेतृत्व बुद्धिवादी म्हणविणाऱ्या केळकरांचेकडे रहाणें अशक्य होतें. अखेरीस त्याचा अपेक्षित परिणाम घडून आला आणि तात्यासाहेब हे अलीकडे अगदीं एकाकी बनले. त्यांचा बुद्धिवाद, ज्यांच्या हातीं त्यांनीं आपल्या राजकारणाचीं सूत्रें दिलीं, त्यांना नियंत्रित करण्यास असमर्थ होता. अखेरीस आपला देश स्वतंत्र झाला हें पाहण्याचें भाग्य त्यांना लाभलें आणि त्या आनंदांत त्यांनीं आपला सर्व पूर्वींचा विरोध क्षणभर बाजूस ठेवून दिलदार अंतःकरणानें गांधीप्रणीत कॉंग्रेसचें अभिनंदन केलें. ज्यांनीं टिळकांच्याबरोबर २५ वर्षें स्वराज्याचा झगडा चालविण्यांत भाग घेतला आणि त्यानंतर २५ वर्षें ज्यांनीं आपली बुद्धि हा लढा कसा यशस्वी होईल याचें चिंतन करण्यांत व या








## कै. दे. भ. तात्यासाहेब केळकर

लढ्यासाठीं योजण्यांत येणाऱ्या निरनिराळ्या धोरणांचें व साधनांचें सूक्ष्म विवेचन करण्यांत आपली सर्व बुद्धि वेंचली, त्यांना अखेरीस या देशांतून ब्रिटिश साम्राज्य कायमचें नष्ट झालें आणि जनतेला लोकशाहीचे व स्वयंनिर्णयाचे हक्क मिळाले, हें पाहून जो आनंद व जें समाधान झालें असेल त्याची कल्पना दुसऱ्याला येणें शक्य नाहीं. अशा आनंदांत व समाधानांत पूर्ण अनायासानें त्यांनीं आपली ऐहिक जीवनयात्रा वयाच्या ७६ व्या वर्षी संपविली. महाराष्ट्राला त्यांच्या विरहामुळें क्लेश होत असले, तरीही त्यांनीं ज्याप्रमाणें आपल्या डोळ्यांपुढें ठेविलेलें साध्य प्राप्त झालेलें पाहूनच आपला देह खालीं ठेवला, त्याचप्रमाणें आपणही आपल्या ध्येयासाठीं खपावें आणि आपल्या अंगचे सर्व गुण त्यांच्याप्रमाणें लोकसेवेला समर्पित करावेत, अशी प्रेरणा त्यांच्या जीवनापासून आजच्या पिढीस खास घेतां येईल. रानडे, टिळक आणि गोखले यांना प्रत्यक्ष पाहिलेले आणि टिळकांच्या बरोबर राजकारणांत भाग घेऊन त्यांचें कार्य आपल्या मताप्रमाणें अखेरपर्यंत करण्यासाठीं तळमळणारे तात्यासाहेब केळकर महाराष्ट्राच्या स्मृतींतून लवकर नाहींसे होणार नाहींत. महाराष्ट्रीय लोक आपल्या या त्यांच्याबद्दलच्या स्मृतीस योग्य असें मूर्त स्मारक लवकरच उभारतील व तें त्यांनीं उभारावें अशी आमची इच्छा आहे.








